नागपूर प्रकाशन क्र. २५

# हंसदूत

प्रा. मधुकर श्रीराम वैद्य,

एम्. ए., एल्. एल्. बी.



★ नागपूर ★
प्रकाशन

सन्
१९४७

मूल्य
सव्वा दोन रुपये

# प्रकाशित वाङ्मय

| क्र. | नाव | प्रकार | लेखक | किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | माझें कादंबरी लेखन | संपादक– | या. मु. पाटक, एम्. ए., एल-एल. बी. | १॥ |
| २ | वीणा | कादंबरी | ( लीला देशमुख, बी. ए., बी. टी. ) | ३ |
| ३ | दोन घडीचा डाव | ,, | ( ,, ,, ,, ) | २॥ |
| ४ | लढवय्ये | कथासंग्रह | ( गं. ल. देवपुजारी, बी.एस-सी. ) | ३ |
| ५ | शककर्ता शालिवाहन- | कादंबरी | ( ना. के. बेहेरे, एम्. ए; बी. एस-सी; एल्. टी. ) | २॥ |
| ६ | प्रमद्वरा | ,, | ( ग. त्र्यं. माडखोलकर ) | २॥ |
| ७ | परामर्श | टीकासंग्रह | ( ,, ,, ) | ३ |
| ८ | द्राविडी प्राणायाम | कादंबरी | ( भा. वि. वरेरकर ) | २। |
| ९ | अमावास्या | ,, | ( शं. बा. शास्त्री, बी. ए. ) | २॥ |
| १० | कंगाल | ,, | ( ,, ,, ,, ) | २। |
| ११ | अडेल तट्टू | ,, | ( ,, ,, ,, ) | ३। |
| १२ | प्रत्यय | ,, | ( शरच्चंद्र टोंगो, बी. ए. ) | २॥ |
| १३ | पुन्हां एकदां ! | ,, | ( ,, ,, ,, ) | ३। |
| १४ | माझी शीला | ,, | ( के. ग. केळकर, बी. ए. ) | १। |
| १५ | म्हणे लढाई संपली | ,, | ( बी. रघुनाथ ) | १॥ |
| १६ | तेरी चूप मेरी चूप आणि इतर गोष्टी | | ( सौ. कमला, फडके, एम्. ए. ) | २ |
| १७ | लांब लांब सावल्या आणि इतर गोष्टी | | ( वाय्. बी. ) | २ |
| १८ | मृगाचा पाऊस आणि इतर गोष्टी | | ( पद्माकर निमदेव, बी. ए. ) | २. |
| १९ | सन् १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाचें स्वरूप- | | ( ह. वा. देशपांडे ) | ॥ |
| २० | दोन प्रख्यात युद्धतंत्रें | | ( ,, ,, ,, ) | २ |
| २१ | सखी | कादंबरी | ( वि. वि. बोकील ) | २॥। |
| २२ | नवीं मूल्यें | लेखसंग्रह | ( पु. य. देशपांडे ) | ३।- |
| २३ | सावलीच्या उन्हांत | | ( प्रा. श्री. ह. अत्तरदे ) | ३ |
| २४ | जीवन प्रवाह | | ( द. ग. प्रधान ) | २॥ |
| २५ | हंसदूत | | ( प्रा. म. श्री. वैद्य ) | २।- |

# लेखकाचे दोन शब्द



"हंसदूत", अगर "दमयंती", ही लघुकथा नव्हे, कादंबरी नव्हे, अगर नाटकही नव्हे हें सहजच लक्षांत येण्याजोगें आहे. या लेखन प्रकाराला आपण फार तर चित्रकथा म्हणू शकूं. 'फार तर' म्हणण्याचें कारण असें की Scenario असं ज्याला इंग्रजीत म्हणतात तो लेखनप्रकार 'हंसदूत' अगर "दमयंती" यांच्या लेखनप्रकारापासून अगदींच वेगळा असतो. त्या प्रकारामध्यें कॅमेऱ्याच्या चिकित्सक दृष्टि-कोनाला विशेष प्राधान्य असतें. कथेंतील पात्राच्या वाक्यागणिक अगर हालचालीगणिक कॅमेरा कुठें कसा ठेवावा याविषयी त्यांत सूचना असतात. दिग्दर्शकाच्या कलात्मकतेची त्यांत खरी कसोटी असते; त्याच्या कल्पनाशक्तीला त्यांत पूर्ण वाव असतो. आणि चित्रपट कलापूर्ण आणि आकर्षक होणें अगर न होणें हें बरेंचसें या सूचनांवर अवलंबून असतें. आता चित्रपटनिर्मितीच्या दृष्टीनें या सूचना कितीहि महत्त्वाच्या असल्या तरी वाचनाच्या दृष्टीने या सूचना महत्त्वाच्या नाहीत, इतकेंच नव्हे तर त्या अनिष्ट आहेत असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. कारण रसग्रहणाच्या दृष्टीने वाचकाच्या मनाची जी एकाग्रता आवश्यक असते ती या सूचनामुळें नाहीशी होते. आणि यामुळेंच Scenario च्या सहाय्याने चित्रपट, अगर बोलपट कितीहि उत्तम निर्माण करतां आला तरी Scenario हा एक वाङ्मय प्रकार होऊं शकत नाही. ललित वाङ्मयचा हा एक मोठाच तोटा आहे यांत शंका नाही. देवदास, माणूस, पुकार, कुंकू, रामशास्त्री, अशांसारखे अनेक उत्तमोत्तम चित्रपट आपण पाहतों, आणि कालांतराने ते सारे विस्मृतीच्या गर्तेत गडप होतात. त्यांना वाङ्मयाचें अमरत्व प्राप्त होत नाहीं; आणि वाङ्मयाचें सुलभत्व तर नाहींच नाहीं. चित्रपटप्रकाशनसंस्थांच्या आणि चित्रपटगृहांच्या मालकांच्या मर्जीवरच अशा चित्रपटांचा पुनर्जन्म किंवा

पुनः—प्रकाशन अवलंबून असतें. ज्या लेखकांनी उत्तमोत्तम कथानकांची जुळणी केली, चटकदार, हृदयस्पर्शी संवाद अगर गीतें बसविली त्यांच्यावर हा एक प्रकारें मोठाच अन्याय होतो. असें जर आहे तर चित्रपटांच्या अनेक मनोरम कथा वाचकांना सुलभ करण्यास मार्ग कोणता ?

या बाबतीत श्री. खांडेकरादि प्रथितयश लेखकांनी केलेले प्रयत्न प्रस्तुत लेखकाच्या वाचनांत आलेले आहेत परन्तु प्रत्यक्ष चित्रपट आणि त्या चित्रपटाची म्हणून त्याच्या नांवावर प्रसिद्ध झालेली कथा यांत फारच तफावत पडते. ती छापलेली कथा वाचीत असतांना, आणि त्या कथेच्याच नांवाचा चित्रपट पाहिलेला असून देखील, त्या चित्रपटाची स्मृति वाचकाला होत नाही—होणं शक्यच नाही. कारण छापलेली कथा ही एक वेगळीच, अगदीच स्वतंत्र अशी, कलाकृति असते, असल्याचें वाचकाला जाणवतें. आता 'एकच प्याला' हे नाटक पाहून आल्या-नंतर त्याच नाटकाची छापलेली आवृत्ति आपण वाचायला घेतली तर हा फरक तितकासा जाणवत नाही; इतकेंच नव्हे तर नाटक गृहात पाहिलेलें नाटक आपण जवळ-जवळ, हुबेहूब, अगदी जसेंच्यातसेंच आपल्या मनश्चक्षूंसमोर आणूं शकतों; आणि पुनः एकदा स्मृति आणि कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें, त्याच नाट्यकृतीचा तसाच रसास्वाद घेऊं शकतो. पण, हें शक्य कसें होतें याचा विचार केला तर एक गोष्ट प्रामुख्याने आपल्या नजरेस येईल, आणि, ती म्हणजे, नाटकगृहातलें दृश्यश्राव्य नाटक आणि आपण वाचीत असलेलें छापलेले नाटक यांतलें उघड उघड दिसणारें साम्य. या दोनही नाटकाचे चेहरे मोहरे अगदी जुळया भावंडांसारखे एकमेकाशी जुळणारे असतात. एकाला लपवून दुसऱ्याला बाहेर काढलें तरीही फरक न कळण्याइतके त्याचे चेहरे व हावभाव एकसारखे असतात. नाटकगृहात पाहिलेलें नाटक आपण तितक्याच तन्मयतेनें वाचूं शकतों. यांतलें इंगित तरी हेंच आहे. तसें म्हटलें तर नाटक-गृहांतले नाटक आणि छापलेलें नाटक यांत किती तरी अंतर असतें. एक दृष्टि गोचर आणि श्राव्य तर दुसरें केवळ कल्पना अगर स्मृति यांनाच गम्य. नाटकगृहात बसून आपण नाटक

पहात असतों त्यावेळी निरनिराळी पात्रें आपल्यासमोर येऊन एकमेकांशी बोलतात, प्रसंगाला साजेसे हावभाव करतात, आणि त्यामुळें नाट्याविषय प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोरच घडल्याचा आभास उत्पन्न होतो; आणि त्या आभासापासून एक प्रकारच्या आनंदाचीही उत्पत्ति होते. पण आपण नाटक वाचीत असतों त्यावेळीं किती निराळी परिस्थिती असते—आपल्याला पाठबळ केवळ कल्पनाशक्ति अगर स्मृति यांचेंच असतें. आणि, असें असलें तरीही या दोनही नाटकांपासून मिळणारा आनंद अगर रसास्वाद एकच, सारखाच, असतो नाही का? आणि याचें एकच एक कारण म्हणजे त्या दोन्ही नाटकांमधलें आंतरिक साम्य—कथेच्या रचनेचें, दृश्यांचें, आणि भावनांचें साम्य; प्रेक्षकांच्या अगर वाचकांच्या हृदयाचा ठाव घेण्याच्या पद्धतींचें, स्मृतीला अगर कल्पनाशक्तीला चालना देण्याच्या पद्धतीचं, साम्य,—नव्हे तादात्म्यच, असें म्हटलें तरी तें वावगें होणार नाही. कारण या दोनही नाटकांच्या कथा, दृश्यें, पात्रें त्यांचे संवाद आणि, त्यांच्या भावनांचा परिपोष या दोन्ही मध्यें अगदी निकट साम्य असतें. किंवा, असे. म्हटलें तरी चालेल की नाटकगृहांत नाटक जसें दिसतें अगदी तसेंच तें कागदावर उतरविलें जाते. एक दुसऱ्याचें आरशातलें. प्रतिबिंबच. आणि तें ही **बोलकें** प्रतिबिंब.

नाटकाच्या बाबतीत शक्य असलेली ही गोष्ट चित्रपटांच्या बाबतीत शक्य कां असूं नये? तशी ती शक्य नसायला, विचारांनी, पटण्यासारखं कांही कारण दिसत नाही. नाटक आणि चित्रपट यांत महदंतर आहे ही गोष्ट उघड आहे. रंगभूमीवर नाटक वठविण्यापेक्षां चित्रपट तयार करणें हें केव्हाही अनेक पटींनी कठिण आहे. चित्रपट तयार करणें म्हणजे विश्वामित्राच्या अट्टाहासाने प्रतिसृष्टि निर्माण करण्यासारखेंच आहे. पण तसेंच पाहूं गेलें तर कोणतीही कलाकृति म्हणजे ओबड धोबड सृष्टि निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाला एक प्रकारचें आव्हानच असतें. असो. तर, तयार झालेला एक चित्रपट म्हणजे कितीतरी कलांचा, कलाकृतीचा, एक समुच्चय असतो; हा समुच्चय म्हणजे केवळ जबरदस्तीने बांधलेल्या लाकडाच्या मोळी सारखा नसतो. चित्रपटांत अनेक कला एकजीव होतात, तादात्म्य पावतात. असा

एकजीव अगर तादात्म्य यथायोग्य रीतीनें व्हायला दिग्दर्शकाच्या अंशीं केवढ रसिकता, केवढी गुणज्ञता, केवढीतरी कलात्मकता हवी. अभिनय, संगीत, चित्र-कला, शिल्पकला, स्थापत्य, वाङ्मय, इतिहास, वगैरे वगैरे अनेक विषयांच्य बाबतीत मार्मिकता असल्याशिवाय चांगला दिग्दर्शक होणें कठिणच आहे. पण हें सारें जरी खरें असलें तरी चित्रकथा लिहिणाराचें महत्व कमी होत नाही. कारण दिग्दर्शकरूपी विश्वामित्राच्या अगर विश्वकर्म्याच्या साऱ्या कर्तृत्वाचा डोलारा चित्र-कथा लेखकाच्या कौशल्यावरच बहुतांश अवलंबून असतो. चित्रकथा काव्यगुणांनें जितकी परिपूर्ण तितकीच चित्रपट चांगला होण्याची शक्यता जास्त, असें समी-करण मांडल्यास तें कांहो वावगें होणार नाही. कारण या गोष्टीचा प्रत्यय चित्रपट पाहणारानां प्रत्यहीं येत असतो. प्राथितयश दिग्दर्शक, ख्यातनाम नट, नटींचा संच, उत्तम स्टुडिओ, या साऱ्यांचें जाहिरातीतलें वर्णन वाचून कित्येकदां आपण मोठ्या उत्साहाने चित्रपट पहायला जातों; आणि कितीदांतरी कथानक अगदीच फाटकें, भिकारडें असल्यामुळें विरस होऊन चित्रपटनिर्मात्यावर आणि एकंदर चित्रपट सृष्टीवर चरफडत घरी येतों. तेव्हां, चित्रपटाचा मूळ पायाच अशी जी चित्रकथ तिचें चित्रपटाशी बहुतांश साम्य असावें असें म्हटलें तर त्यांत वावगें काय आहे ! आणि, अशक्य असें तरी त्यांत काय आहे ? नाटक पाहणें आणि नाटक वाचणें या दोन क्रियांचा जो परस्पर संबंध, तोच किंवा तत्सम संबंध, चित्रपट पाहणें आणि चित्रकथा वाचणें यांत कां असूं नये ? यांत कठिण, अनाकलनीय असें काय आहे ? नाटक वाचतांना आपण आपल्या मनश्चक्षूंसमोर विविध प्रसंग आणतों तें कसें शक्य होतें ? नाटककार वाचकाला ठिकठिकाणी ज्या सूचना देत असतो, त्यांचीच मदत घेऊन वाचकाची कल्पनाशक्ति साऱ्या भराऱ्या मारीत असते ना ? चित्रकथांमध्येंही अशाच प्रकारच्या सूचना यथायोग्य रीतीनें दिल्या गेल्यास चित्र-कथा वाचणेंही तितकेंच सुलभ आणि हृद्य होईल, असें म्हणायला कांही हरकत दिसत नाही. आतां, कल्पनाशक्तीला पंख देणाऱ्या या सूचना कोणत्या असाव्य असा प्रश्न उद्भवणें साहजिक आहे. परंतु कथानकाच्या रसास्वादाला जरूर त्याच आणि जरूर तेवढ्याच सूचना चित्रकथेंत दिल्या जाव्यात असें या प्रश्नल

सरळ उत्तर देतां येईल. निदान छापलेल्या नाटकांत ज्या प्रमाणें "रागाऊन", "प्रेमळपणाने", "वैतागून" वगैरे भावना अगर आविर्भाव दर्शविणाऱ्या सूचना असतात तशाच प्रकारच्या सूचना चित्रकथेच्या वाङ्मयीन प्रकारांत असाव्यात असें तर खासच म्हणतां येईल. छापलेल्या नाटकांत ज्या प्रमाणें कोणत्या पात्रानें "विंग" मधून किती पुढें यावें हें लिहिलेलें नसते, लिहिण्याची जरूर नसते, त्या प्रमाणेंच अशा धर्तीच्या केवळ यांत्रिक सूचना चित्रकथेंतही द्यायची जरूर नाही. भावुकता हा साऱ्या ललित वाङ्मयाचा आत्मा; भावगीतें, लघुकथा, नाट्यछटा, नाटकें, कादंबऱ्या अगर महाकाव्यें या सर्वांचे हृदय, नव्हे पंच प्राण, या भावुकतेंत आहेत. आतां हृदयाचा ठाव घेण्याची, हृदय हालवून सोडण्याची प्रत्येकाची पद्धत वेगळी असली तरी साऱ्यांच्या मुळाशीं भावुकता ही एकच गोष्ट आहे; आणि या एका गोष्टी मुळेंच या सर्व वाङ्मयप्रकारांपासून वाचकाच्या मनाला एक प्रकारचा आनंद होत असतो. ही भावुकता ज्याला साधली त्याने जिंकली. ही गोष्ट लक्षांत घेऊनच चित्रकथा लेखकानेही आपल्या सूचनांची योजना करायला हवी.

नाटकांतले प्रवेश, कादंबऱ्यांची प्रकरणें, लघुकथामधले परिच्छेद, अगर भावगीतांतली कडवी, या साऱ्यांचा विचार केला असता एक महत्वाची गोष्ट लक्षांत येते. आणि ती म्हणजे या सर्वांमधलें मौलिक साम्य; आणि हेंही लक्षांत येतें कीं भावनांचा परिपोष अगर रसपरिपोष यथार्थतेने व्हावा म्हणून लेखकाला आपल्या वर्ण्यविषयाची टप्याटप्यानें काळजीपूर्वक मांडणी करावी लागते,—नव्हे अशी टप्याटप्याने मांडणी केल्याशिवाय त्याचें भागत नाही; आणि, त्याने आपल्या लेखनांत योजिलेले जे वेगवेगळे टप्पे त्यांचीच ही प्रवेश, प्रकरणें वगैरे स्थलकाल परत्वें दिलेली भिन्न भिन्न नावें आहेत, हें ही मग स्पष्ट होईल. भावगीतें म्हणजे जिव्हाळ्याच्या माणसाशीं केलेल्या एक प्रकारच्या गुजगोष्टीच. ही भावगीतें बहुधा लहान असतात; पण अशा या भावगीतांत देखील अनेक कडवी असतात. भावनांचा क्रमशः परिपोष हाच या कडव्यांचा आंतरिक उद्देश नसतो काय ? भावगीतांत कथन करावयाच्या भावनांचा परिणामकारकपणा वाढविण्याच्या दृष्टीनेच या पायऱ्यांचीं उभारणी नसते का ? लघुकथांचेही परिच्छेद अशाच प्रकारचे

असतात. नाटकांचे अंक आणि प्रवेश यांमध्येंही हीच कल्पना प्रामुख्याने अनुस्यूत असते. अर्थात् या कल्पनेबरोबरच नाटककाराला रंगभूमीच्या तंत्राकडेही लक्ष पुरवावें लागतें हेंही तितकेंच खरें. भावगीत, लघुकथा, अगर नाट्यछटा यांचे लेखक आपापल्या लेखनविषयाच्या गेयत्वाकडे आणि वाचनीयत्वाकडे विशेष लक्ष देतात, तर नाटककाराला इतरही अनेक गोष्टीकडे लक्ष द्यावें लागतें. रंगभूमीचा संच, श्रोतें आणि सरते शेवटी, वाचक या तिघांहीकडे नाटककाराला सारख्याच दक्षतेनें लक्ष द्यावें लागतें. परंतु यासर्वांआधी नाटककाराला एका गोष्टीकडे सतत ध्यान द्यावें लागतें. आणि ती म्हणजे आपल्या कथाविषयाच्या रचनेचा परिणामकारकपणा, अथवा प्रेक्षक, श्रोते आणि वाचक या सार्‍यांच्या मनाची पकड घेण्याची कथानकाची पात्रता. नाटक लिहितांना नाटककाराचें लक्ष मुख्यत्वें करून, आपलें नाटक आकर्षक, मनोवेधक, हृद्य कसें होईल याच गोष्टीकडे असतें. आणि म्हणूनच आपल्या नाट्यविषयाची जुळणी करताना त्यातले अंक अगर प्रवेश यांची मांडणीही तो याच धोरणानें करीत असतो. कादंबरीचें क्षेत्र आणि तंत्र नाटकाहून थोडें निराळें असले तरी कादंबरीची निरनिराळीं प्रकरणें पाडतांनासुद्धा कथानकाचा परिणामकारकपणा अगर मनोवेधकता हीच गोष्ट कादंबरीकाराच्याही मनांत प्रामुख्याने वावरत असते. याच प्रकारें चित्रकथेंतही भावनापरिपोषाच्या दृष्टीने कथानकाचे काही भाग पाडणें अवश्य आहे. परंतु या भागांना आजपर्यंत रूढ असलेल्या वाङ्मयप्रकारांचे सर्वमान्य नियम लावतां येणार नाहीत. नाटकाच्या अगर कादंबरीच्या पद्धतीने यांत अंक, प्रवेश, अगर प्रकरणें संभवणार नाहीत. यांचें मुख्य कारण म्हणजे चित्रपट ही गोष्टच सर्वस्वी नवीन आहे. नाटकाच्या प्रवेशांचा आधार घेऊन त्याच पद्धतीनें तयार केले गेलेले चित्रपट सर्वस्वी अपयशी ठरले हेंही सर्वांस विदितच आहे. कादंबर्‍यांच्या साहाय्याने चित्रपट तयार करतांना कादंबर्‍यांची किती चीरफाड करावी लागते, अगर केली जाते हेंही सुप्रसिद्धच आहे. या सर्व गोष्टींचें मूळकारण हें आहे की, चित्रपटाचें सारें तंत्रच अगदीं वेगळें व सर्वस्वी नवीन आहे. अशा स्थितीत चित्रकथा लेखकाने वर्ण्यविषयाचे टप्पे पाडतांना आपलें स्वतःचें असें वेगळेचें तंत्र अवलंबिलें तर त्यावर कोणाचाही रोष होण्याचें कारण नाही. कारण वरवर पाहतां नाटकांचे अंक, कादंबर्‍याचीं प्रकरणें आणि

चित्रकथांचे छेदक यांत कितीही फरक दृष्टीस पडला तरी मूलतः या सार्‍यांमध्यें एक साम्य आहे, आणि तें साम्य म्हणजे या अंकप्रवेशादिकांच्या योजनेतल्या हेतूचें साम्य.

वाङ्मयाचा कोणताही प्रकार लेखकाने लिहावयास घेतला तरी त्याला एका गोष्टीची नेहमी जाणीव ठेवावी लागते. आणि ती गोष्ट म्हणजे, आपण जें काय लिहिलें असेल त्याचा प्रेक्षकाच्या, श्रोत्याच्या अगर वाचकाच्या मनावर काय परिणाम होतो हें: म्हणजे, मी जें काय लिहितों तें प्रेक्षकाला कसें दिसतें, श्रोत्याला कसें ऐकूं येते, अगर वाचकाच्या मनाला तें कसें रिझवतें. नाटककाराला इतरांपेक्षां या गोष्टीकडे जास्त लक्ष द्यावें लागतें; कारण त्याला प्रेक्षक, श्रोता आणि वाचक या तिघानाही खूष ठेवावयाचे असते. थोडक्यांत सांगायचे म्हणजे नाटककार हा आपलें नाटक नाट्यगृहात प्रेक्षकांच्या रांगेंत बसून लिहिल्यासारखें लिहीत असतो. रंगभूमीच्या रचनेकडे अगर संचाकडे त्याचे लक्ष असलें तरी नाटक लिहितांना प्रेक्षक आणि श्रोते हेच प्रामुख्यानें त्याच्या नजरेसमोर असतात. त्या प्रेक्षक श्रोत्यांच्या समुदायाला हसवतां, रडवता, रिझवतां कसें येईल, त्यांच्या त्या खुर्च्यां-तून अगर "पीट" वरून नाटक कसें दिसेल, कसें ऐकूं येईल, मनावर कसा परि-णाम करील हीच त्याला विवंचना असते. नाट्यरचनेच्या तंत्राची मख्खी सारी इथें आहे. आणि ही ज्याला हस्तगत झाली त्याची नाटकें, कथानक कितीही रद्दी असलें, नाटककाराला कांही महत्वाचें सांगायचें असले अगर नसलें तरीही लोकप्रिय होतात—झालेली आढळात आहेत. चित्रकथा लेखनाचेंही असेंच आहे. चित्रकथा पडद्यावर कशी दिसेल याच गोष्टीची चित्रकथालेखकानें मुख्यत्वें करून काळजी घ्यायला हवी. मात्र या दोन्ही प्रकारांच्या लेखन पद्धतीतलें हें साम्य इथेंच संपतें कारण नाटक आणि चित्रपट ही दोन्हीही अगदी भिन्न भिन्न पद्धतीने तयार केली जातात. नाटककाराप्रमाणें चित्रकथालेखकाला, चित्रपट तयार केला जातो तेथील सर्व तंत्राची माहिती असणें फारसें महत्वाचें आहे असें नाही. कारण एकतर, लेखनाशी मुळीही संबंध नसलेल्या अनेक गोष्टी तिथें फार महत्वाच्या असतात; आणि दुसरें असें कीं, तसा आपण हट्टच धरिला तर चित्रकथा या

वाङ्मय प्रकाराला आपण मुकूं, अगर चित्रकथा लिहिण्याची मिरास कांहीं खास लोकांच्याच हाती राहील, आणि नाट्यवाङ्मयाप्रमाणें चित्रकथा हें सर्व जनतेचें असें वाङ्मय होणार नाहि. आजपर्यंत या लेखनप्रकाराकडे जबाबदार लेखकांनी केलेल्या दुर्लक्षाचे परिणाम आजही दिसत आहेत. चित्रकथा ही Scenario प्रमाणें स्टूडिओतल्या तंत्राचे ज्ञान असणारानेंच लिहिली पाहिजे असा अट्टाहास करण्यांत अर्थ नाहीं, कारण तसा Scenario लिहिणें चित्रपटसृष्टीशी संबंध नसणारांना कधींही लिहितां येणें शक्य नाही. पुनः वाङ्मयाच्या दृष्टीनें तशा Scenario ची जरूर नाहि, अगर त्याला तितकें महत्वही नाहि. कारण अशा चित्रकथेंत वाक्यागणिक, क्षणोक्षणी येणाऱ्या सूचनांमुळें वाचकांचीं मनें कथा-विषयाशीं तन्मय होणें अवघड, नव्हे अशक्य, होईल; आणि क्षणोंक्षणी वाचकांचा विरस होईल. अशा तांत्रिक चित्रकथेपेक्षां प्रेक्षकांशी समरस होऊन लिहिली गेलेली चित्रकथाच वाङ्मयदृष्ट्या अधिक सरस व आकर्षक होईल असें म्हणायला हरकत नाही. चित्रकथा पडद्यावर कशी दिसेल अगर दिसली पाहिजे या गोष्टीकडे लक्ष देऊन लिहिली गेलेली कथा खास हृद्य होईल. कारण, अशा कथेपासून काय अपेक्षा करायच्या हें वाचकांना ताबडतोब ठरवितां येईल. आणि लेखकाच्याही दृष्टीने तो एक मोठाच लाभ होईल. Scenario मधील तंत्राच्या, वाङ्मयदृष्टीने निरर्थक माजविलेल्या, स्तोमापासून त्याची सुटका होईल, आणि त्याच्या कथांना एक प्रकारचा मोकळेपणा येईल; पावलागणिक येणारे Scenario मधील तंत्राचे अडथळे त्याच्या वाटेतून दूर होतील. आणि ललित वाङ्मयामध्यें एक अगदीं नवीन, सर्वांगपरिपूर्ण, आणि मनोरम असें दालन उघडलें जाईल. सौंदर्यामध्यें चित्रकथेची बरोबरी करणारा दुसरा वाङ्मयप्रकार उरणार नाहीं. भाव-गीताची उत्कटता, लघुकथेचा निटसपणा, नाटकाचें घटनागर्भ रमणीयत्व, आणि कादंबरीचें जीवनाशीं असलेलें नीकटत्व आणि सादृश्य या साऱ्या गोष्टी या नव्या लेखन प्रकारांत येण्यासारख्या आहेत.

या आणि अशा प्रकारच्या अनेक विचारांनी प्रेरित होऊन प्रस्तुत लेखकानें हंसदूत व दमयंती हीं कथानकें हातीं घेतलीं. वर उल्लेखिलेले सारेच गुण या दोन्ही

कथांमध्यें आहेत असें ह्मणण्याचें धाडस प्रस्तुत लेखक कधीही करणार नाहीं. अगदीं नवीन पद्धतीने लिहिलें गेलेले हें पहिलेंच लिखाण असल्यामुळें त्यांत पुष्कळच दोष असतील या गोष्टीची लेखकाला पुरेपूर जाणीव आहे. " यद्रोचते तद् ग्राह्यम् " अशी या बाबतींत लेखकाची भूमिका आहे.

बऱ्याच लहान वयापासून लेखकाला चित्रपट पाहण्याचा नाद आहे. आणि त्या बरोबरच चित्रपट पाहतांना चिकित्सक बुद्धीने तो पाहण्याचीही संवय आहे. त्यामुळें चांगला चित्रपट कसा असावा, चांगला चित्रपट म्हणजे काय, या-विषयीं साहजीकच मनांत विचार येत. शिवाय असेंही वाटे कीं आपण पाहिलेल्या चांगल्या चित्रपटांच्या कथा पुस्तकरूपानें मिळाल्या असल्या तर किती बरें झालें असतें. फुरसतीच्या वेळी केव्हांही त्या कथा वाचतां आल्या असत्या, आणि पूर्वी पाहिलेल्या नाटकांपासून ती घरी बाचत असतांना मिळणारा अननुभूत आनंद आणि रसास्वाद याही बाबतीत पुनः उपभोगितां आला असता स्मृतिसुख हें प्रत्यक्षापेक्षां अगर स्वप्नरंजनापेक्षांही अधिक मधुर असतें, नाही तर आपण सारे जण, सिनेमांत अगर बैठकींत ऐकलेलीं गोड गाणी, बेसूर आणि बेतालपणें, भसाड्या आवाजांत सुद्धां, अगदी तन्मयतेने, वेळी अवेळीं, स्थानी अस्थानीं—न्हाणी-घरांत सुद्धां—कशाला गात बसलों असतों ? पण, हें स्मृतिसुख आज शक्य नाही. तें तसें कां असूं नये ? अशा विचारांनी प्रेरित होऊनच या दोन्ही कथा लिहिल्या गेल्या आहेत. अर्थात त्या लिहितांना लेखकाला एक अगदींच वेगळे तंत्र वापरावें लागलें आहे. आणि त्या तंत्राचा पाया म्हणजे, आपण लिहिलेलें पडद्यावर कसें दिसेल, हा एकच एक विचार. किंवा असेंही म्हणतां येईल की पडद्यावर पाहिलें आणि कागदावर उतरविलें, अशा प्रकारची रीति लेखकानें अवलंबिली आहे. त्यांत त्याला यश कितीं आलें आहे, हें वाचक वर्गानेच ठरवावयाचें आहे.

---

# दमयंती

नल-दमयंतीची कथा वाचकांना अपरिचित नाहीं; जुन्या संस्कृत अगर मराठी कवींनी या कथेवर रचिलेलीं काव्यें सुप्रसिद्धच आहेत. पण त्यांनी लिहिलेलीं काव्यें आव्यें आणि प्रस्तुत कथा यांत पुष्कळच फरक आहे. आणि तो फरक दृष्टिकोनाचा असल्यामुळें इथें त्याचा उल्लेख करणें उचित वाटतें. आजपर्यंत, नलदमयंतीच्या आख्यानावर जेवढीं म्हणून काव्यें रचिलीं गेलीं त्या साऱ्यांचा भर नलदमयंतीच्या स्वयंवरावर असे. नल आणि दमयंती यांच्या रूपगुणांचें वर्णन करण्यांतच या कवींनी आपली सारी काव्यशक्ति खर्च केली. अर्थात् हें सर्वस्वी चूक होतें असें नव्हे; पण नलदमयंतीच्या प्रणयकथेच्या अपूर्वत्वाकडे त्यांचें अहेतुक वा सहेतुक दुर्लक्ष झालें असें ह्मणायला हरकत नाहीं. वस्तुतः या प्रणयकथेची बरोबरी करणारी दुसरी प्रणयकथा उभ्या जगाच्या वाङ्मयात सांपडणार नाही. रोमिओज्यूलिअट या कथेतला उत्कटतेचा भाग नलदमयंतीच्या कथानकांत नाहीं असें कोण म्हणूं शकेल ? डेस्डिमोनेचा साधे भोळेपणा, बाळबोधपणा, विश्वस्तवृत्ति, आणि सोज्वळपणा, आणि तिच्या आयुष्यांतल्या कारुण्याची, पण एक वेगळीच, छटा दमयंतीच्या जीवनांत नाहीं काय ? आणि, क्लिओपाट्राचा भारदस्तपणा व रुबाब दमयंतीत खासच आहे. टागोरांनी ह्मटल्याप्रमाणें शकुंतलेच्या जीवनांत सांपडणारा स्वभावपरिपोषहि या कथानकांत आहे; इतकेंच नव्हे तर शकुंतलेप्रमाणेंच चित्ताची, चारित्र्याची उदात्तता, आत्मिक उन्नतिही यांत आहेच आहे. खरें पाहतां, दमयंती म्हणजे एका पराक्रमी राजाची अत्यंत लाडकी अशी एकच एक कन्या. तिनें कांहीं मागितलें, हवें म्हटलें, आणि तें तिला मिळालें नाही असें तिच्या बालजीवनांत कधीं घडलेंच नव्हतें. अशी, रूपसंपदेनेयुक्त अशी, एक राजाची लेक, अनुरूप अशा राजपुत्राशीं विवाह करूं इच्छिते यांत विशेष असें काय आहे ? यौवनाच्या उन्मादांत प्रणयीजन एकमेकांवरून सारें विश्व ओवाळून टाकायला तयार असतात, उघड्या डोळ्यांनी मृत्यूला आलिंगन द्यायला कचरत नाहींत, कुबेराच्याही संपत्तीला ठोकरीनें उडवितात, हें यौवनाला साजेसेंच नाहीं काय ? दमयंतीने, लोक-

पालांना अव्हेरून, मृत्युलोकी राहणाऱ्या रूपसुंदर नलराजालाच वरिलें तें सारें यौवनसुलभच नाहीं काय ? तें सारें रमणीय असलें तरी त्यांत असामान्य असें काय आहे ? जगांतल्या कुठल्याही प्रणयकथेंत तत्वतः याहून वेगळें असें काय असतें ? बुद्धीला, सारासार विचाराला, व्यावहारिकतेला, दासाप्रमाणें जबरदस्तीनें फरफटत नेणारा तोच तर खरा प्रणय. आणि या प्रणयामुळेच तर अगदी गरिबींत वाढलेलीं युवयुवती सुद्धां प्रेमविवाह करतात. मग, सुखासमाधानांत वाढलेल्या नलदमयंती-सारख्या राजघराण्यांतल्या व्यक्तींनी प्रेमविवाह केला तर त्यांत विशेषसें काय आहे ? खरोखरच विशेष असें त्यांत कांहीं नाही; कारण साऱ्या प्रीतिविवाहांचा प्रकार, मुलतः एकच असतो. पण नलदमयंतीची कथा इथेंच संपत नाहीं.

स्वयंवरानंतरच नलदमयंतीची खरी कथा सुरू होते. ह्या दोघांच्याही परस्परा-वरील प्रेमाची कसोटी स्वयंवरानंतरच्याच त्यांच्या जीवनांत लागते. आणि त्या कसोटीस ती दोघेंही पूर्णपणं उतरतात यांतच नलदमयंतीच्या कथेंचें व प्रणयाचें असामान्यत्व आणि अपूर्वत्व आहे. या अतुलनीय दंपत्याच्या उदात्तजीवनाला केवळ पार्श्वभूमि साजण्याइतकेंच महत्व त्यांच्या विवाहाला आहे; अर्थात् पुढील उदात्त जीवनाला साजेशीच ही पार्श्वभूमि आहे हें नाकरतां येण्यासारखें नाहीं. आणि हें कथानक निर्माण करणाऱ्या मूळ रचनाकाराची असामान्य आणि मूलगामी कलात्मकता यांत दिसते हेंही तितकेंच खरे आहे. आणि तरीहि, नल-दमयंतीचे उत्तरायुष्य आपल्याला अवगत आहे तसें घडलें नसते, अगर रचिलें-गेलें नसतें, तर नलदमयंतीची प्रणयकथा इतर अनेक कथांप्रमाणें चटकदार जरूर झाली असती, पण ती आज आहे इतकी उदात्त आणि सर्वांग परिपूर्ण झाली नसती खास.

नल दमयंतीच्या कथेचे कथानकाच्या आणि भावनांच्या परिपोषाच्या दृष्टीने वस्तुतः तीन भाग पडतात. पाहिला भाग म्हणजे दमयंतीचें स्वयंवर; दुसरा म्हणजे द्यूतखेळून राज्य गमावल्यामुळें नलदमयंतीला वनवासाला जावें लागतें तो; आणि, नलाच्या शोधार्थ दमयंती लटकेंच स्वयंवर मांडते तो तिसरा. या तिसऱ्या भागां-

तच नल आणि दमयंती यांची खरी ओळख आपणास पटते; त्यांच्या प्रणयाच्या उदात्ततेची आणि अमरत्वाची साक्ष पटते. पहिला भाग हा यौवनाच्या उत्कटतेने व धडाडीने भरलेला आहे. रोमिओज्युलिअट, अथेल्लो डेस्डिमोना, अँटनीक्लिओपाट्रा अगर डांटे आणि त्याची प्रिया बीट्रिस, या जगप्रसिद्ध प्रणयकथांची उत्कटता, रमणीयता, नलदमयंतीच्या कथेंत, या पहिल्या भागांत आहे; व त्यांच्याशी त्याची तुलनाही होऊं शकेल. द्यूताचा जो दुसरा भाग त्यांतले वनवासादिक कष्ट सीता द्रौपदींच्या दैवी कथांत सांपडतील; गडकऱ्यांच्या सिंधूचीहि या ठिकाणीं आठवण झाल्या शिवाय राहणार नाही. पण दमयंतीच्या कथेचा जो तिसरा भाग त्याला जगाच्या वाङ्मयांत तोड नाहीं. युलिसिसची पत्नी मनाचें सारें बळ एकवटून त्याची वाट पहात असते हें खरें, तरी पण त्यांत दमयंतीची उत्कटता, असली तरी धैर्य आणि चातुर्य खास नाहीं. दाही दिशांना शोध करूनही प्रियकराचा पत्ता लागत नाहीं, अशा परिस्थितीत एकच एक आशेचा किरण दिसल्याबरोबर, दुःखाने गांजलेली, आणि पतीने एक प्रकारें नाडलेली ती दमयंती, आपला प्रियकर मिळावा म्हणून आपलें सर्वस्व पणास लावायला तयार होते यांतच तिच्या प्रणयाचें दिव्यत्व, असामान्यत्व, अलौकिकत्व आहे. चरित्रवानाला चारित्र्य हें प्राणांपेक्षांही प्रिय असतें. त्या चारित्र्याची थोडी शंका आल्याबरोबर श्रीरामचंद्राने सीतेचा त्याग केला हे प्रसिद्धच आहे. आणि राजा या नात्यानें, लोकपालक, लोक नायक, या नात्यानें रामचंद्राने तसें करणें युक्तच होतें हें कोणीही कबूल करील. आणि दमयंती तर सच्चारित्र्याची मूर्तिच होती. ती तशी चारित्र्यवान् नसती तर तिने द्वितीय स्वयंवर उभारण्याचें, चारित्र्याला एक प्रकारें कलंक आणूं पाहणारें, महाभयंकर धाडस,–एक प्रकारचें अग्निदिव्यच तें—, कधींही केलें नसतें. असलें भयंकर धाडस करणारी दुसरी प्रणयिनी कुणाच्या ऐकिवांत नाहीं. अर्थात् हें धाडस करण्यांत दमयंतीची उत्कटताच दिसून येते. आणि या तिच्या धाडसाबद्दल तिचें कौतुकच करावेंसे वाटतें. पण हेंही तितकेंच खरें कीं हें धाडस करतांना दमयंती भाबडेपणाने वागत नाहीं; तर अत्यंत हुषारीने वागून ती आपलें इष्ट साध्य करून घेते. दुसऱ्या स्वयंवराची भुमिका नळराजाच्या कानींच काय ती जावी, फार तर

भांगासुरि ऋतुपर्ण अगर अशाच इतर अगदी अपरिहार्य व्यक्तींच्याच कानीं ती बातमी जावी, अशी दक्षता ती घेते. यांत जी कथा मूळ रचणाऱ्याने खरोखरच कौशल्य दाखविलें आहे. नाहींतर दमयंतीचे दुसरें स्वयंवर हें तिच्या चारित्र्याला एक दूषणच झालें असतें. असो दमयंतीने उभें केलेलें हें दुसरें स्वयंवर म्हणजे तिच्या उदात्त प्रणयी जीवनाचा सुयोग्य परिपाकच. आणि म्हणूनच या तिसऱ्या भागांत इतर भाग सहजच समाविष्ठ होतात. एकाद्या देवतेच्या सुंदर चित्रामध्यें दूरवर दिसणारे रम्य पर्वत अगर अरण्यें, अगर निर्झर, यांची जी योग्यता तीच किंमत दमयंतीच्या पूर्व जीवनाला आहे.

**लेखक**

# हंसदूत

## ( १ )

### अंतःपुराजवळचे एक उपवन

वेळ सूर्यास्ताची आहे. वातावरण, मनाला एक अज्ञात हुरहूर लावून देणारं आहे.

कांही अंतरावर एक पुष्करिणी असून, ती कमलांनी फुलून गेली आहे. पुष्करिणीच्या चहूंबाजूंस हिरवळ पसरलेली आहे.

आकाशाच्या नारिंगी आणि नील छटांच्या मधोमध शुक्राची चांदणी चमकते आहे—एकाद्या गौर स्वर्सुंदरीने भिवयांच्या मधोमध लावलेली टिकलीच जणूं—अन् त्यामुळेच जणू तिच्याकडे टक लावून पहात नलराजा हळुहळू पुष्करिणीकडे येतो आहे. त्याचा चेहरा उदास अन् डोळे धुंद आहेत. विचार-विकारांचें तांडव चेहऱ्यावर आणि अंगांच्या हावभावांनी स्पष्टच दिसतें आहे. शुक्राच्या चांदणीकडे पाहतां पाहतां मधेंच त्याची नजर खालीं वळते आणि पायाशींच दिसणारा एक दगड तो ठोकरीने ताडकन् दूर उडवून देतो; आणि क्रोधयुक्त पण निराश दृष्टीने तो दूरवर नजर टाकतो. चार पावलें जातो न जातो तोंच एक झाड त्याच्या दृष्टीस येतें. काडकन् त्या झाडाची एक खांदी तोडून तिचे कडाकड तुकडे करीत,

ते चारी बाजूंना भिरकावून देत, पूर्वीच्याच चेहऱ्याने, व जड पावलांनी तो पुढें चालूं लागतो. जवळच दिसणाऱ्या एक शुभ्र शिलासनावर अंग टेकून, डोक्याखालीं हात घेऊन, तो बसतो; आणि शून्य दृष्टीने शुक्राच्या चांदणीकडे टक लावून पाहूं लागतो.

इतक्यांत, पश्चिमेकडून येणारा, स्वतःच्या तेजामुळे चमकणारा सुवर्णमय हंसांचा थवा त्याला दिसतो. प्रथम स्वतःच्या विचारांत गुंग असल्यामुळे त्याचें तिकडे लक्ष नसतें. पण जेव्हां द्रुतगतीने उडणारे ते हंस, समोरच दिसणाऱ्या पुष्करिणीच्या कडेला असलेल्या हिरवळीवरच उतरतात तेव्हां मात्र त्यांच्या त्या आश्चर्यकारक रूपाने नलाचें लक्ष तिकडे वेधतें. तो एकदम उठून चोरपावलांनी हंसांच्या दिशेने चालूं लागतो; आणि हंसांच्या जवळ आल्यावर जवळच दिसणाऱ्या एक हंसावर वेगाने झडप घालतो. त्याच्या त्या कृतीने दचकून सगळेच हंस सैरा वैरा पळूं लागतात. नलाने ज्या एक मोठ्या हंसावर झडप घातलेली असते तो मोठ्या वेगाने पुष्करिणीकडे धावूं लागतो; आणि नलही त्याचा निकराने पाठलाग करतो. एकमेकांना चकवितां चकवितां ते दोघेही पुष्करिणीच्या अगदीं काठाशी येतात. आणि, जिवावर उदार झालेला तो हंस पुष्करिणींत झेप घेऊन स्वतःला सोडविणार तोंच चित्त्याच्या चपळाईने नल त्याला धरितो; पंख फडफडवून नलाच्या हातून निसटून जाण्याचे त्याच प्रयत्न निष्फळ होतात; आणि तो हताश होऊन निश्चल होतो.

**नल**—( हंसाला तर्जनीने हिणवीत ). "पकडला कीं नाहीं! पळून जात होतास नाहीं का?

**हंस**—( दुःखित स्वराने )) मेलेल्याला मारणं, वीरोचित नाहीं, राजन्!

**नल**—( दचकून, इकडे तिकडे पहात, रागाने ) कोण आहे?

**हंस**—( हंसत ) मीच तो, राजन्! आपण धरलेला राजहंस!!

**नल**—( साश्चर्य ) तुला मनुष्यवाणी अवगत आहे, राजहंसा!

**हंस**—होय राजन्!

**नल**—तुझं म्हणणं खरं आहे राजहंसा. मी तुला हिणवीत नाही. जा, वीरा तूं स्वतंत्र आहेस !

नल हंसाला सोडून देतो. सुटल्याबरोबर हंस पुष्करिणीमधें एकदम झेप घेतो, आणि स्वैरपणें पुष्करिणीला चारपांच फेऱ्या मारून, पाण्यांतच पण नला-समोर, त्याच्या अगदी पायाशी येतो. हंसाची ती स्वैर क्रीडा, नल सकौतुक बघत असतो.

**हंस**—( नलास उद्देशून ) उदारा, मी तुझं कोणतं प्रिय करूं ?

( नल कांहींच न बोलतां तसाच पहात राहतो. )

जीवदान देऊन आपण मला आपला दास केलं आहे !

**नल**—( विचारांच्या गुंगीत, स्वतःशींच बोलल्या सारखें ) मित्रा, माझं प्रिय तूं करूं शकशील ?

**हंस**—( सद्गदित होऊन ) कां नाहीं, राजन्! प्राणांच्याही मोलानं मी तें करीन.

( नल पुष्करिणीच्या काठाशीं आडवा होतो; आणि हातांच्या तळव्याचा हनुवटीस आधार देऊन हंसाशी बोलतो. )

**नल**—राजहंसा !

**हंस**—हं !

**नल**—विदर्भराज भीमाच्या कन्येचं, दमयंतीचं, नांव तूं ऐकलं आहेस का?

**हंस**—त्या सौंदर्यवतीचं नांव ऐकलं नाही असा साऱ्या त्रिभुवनांत तरी कुणी सांपडेल का, राजन् ?

**नल**—( उत्सुकतेने, अधीरतेने ) राजा !...

**हंस**—( हंसत, सहृदयतेने, प्रेमळपणें ) कळलं, कळलं राजन् ! ती वैदर्भी तुला खरोखरच जर इतकी प्रिय असेल तर मी तिचं मन तुझ्याकडे खचित वळवीन.

**नल**—( कृतज्ञतेने सद्गदित होऊन ) मित्रा !

**हंस**—सुवर्णाला सुगंधाची जोड देण्याचं कोण नाकारील राजा? रति आणि मदन यांचा संयोग व्हावा असं कुणाला वाटणार नाही? खरं सांगतों, नैषधा, तुझ्या इतका सुंदर पुरुष अजून माझ्या पाहण्यांत नाहीं. मला नाही वाटत ती वैदर्भी तुझ्या इतकी रूपसंपन्न असेलसें.

**नल**—( क्रुद्धस्वरांत ) हंसा!!

**हंस**—( घाईघाईने ) जाऊं दे, तें कसंही असो. दमयंतीचें मन तुझ्याकडे वळविण्याचें मी तुला वचन देतों.

**नल**—तथास्तु!

**हंस**—आपल्या दूतास रजा द्यावी.

**नल**—जा! तुझं कुशल असो.

आपल्या पंखांनी, सोसाट्याने सुटलेल्या वाऱ्यासारखा आवाज करीत राजहंसांचा तो कळप मनोजवाने उडून जातो. तो दूर जातां जातां अगदी दिसेनासा होईपर्यंत नल त्या कळपाकडे टक लावून पहात असतो.

## ( २ )

## विदर्भाच्या राजवाड्यांतलें प्रमदावन

दमयंती आणि तिच्या सख्या क्रीडा करीत आहेत. कुणी झाडांना पाणी देत आहेत; कुणी फुलांच्या माला गुंफीत आहेत; कुणी गाणी गात निरनिराळे खेळ खेळत आहेत. कुणी जवळच असलेल्या पुष्करिणीच्या काठाशीं बसून, तीत पाय सोडून पायांनी पाणी उडवीत आहेत; कुणी हिरव्याचार गवतावर नुसत्याच पहुडल्या असून दातांत तृणांकुर धरून गोष्टी करीत आहेत; तर कुणी, मोठमोठ्या झाडांना बांधलेल्या, झोपाळ्यावर झोके घेत आहेत.

एक सखी एका वेलीला पाणी घालीत असून तिच्या खांद्यावर हात टेकून दमयंती उभी आहे. दोघीही त्या वेलीकडे टक लावून पहात आहेत. मधेंच ती सखी दमयंतीकडे बघते, आणि तिची तंद्री लागली आहे असें पाहून वात्रटपणें म्हणते,

" म्हटलं, एवढा कसला विचार चाललाय्!! "

**दमयंती**—( दचकून ) कुठं ?

**सखी**—( त्याच स्वरांत ) माझी प्रीतिलता कधी बरं अशीच फुलेल? असंच ना ?

( दमयंतीची हनुवटी धरीत तिच्याकडे हंसऱ्या, खट्याळ दृष्टिने बघते. )

**दमयंती**—( लाजून, तिचा हात झिडकारीत ) चल, चहाटळ कुठली !

सखी स्वतःशींच हंसते, आणि दमयंती लाजून दुसरीकडे निघून जाते.

कांही जणी हार गुंफीत असतात, त्यांचेकडे ती येते. तिच्या विचारग्रस्त मुद्रेकडे बघून दमयंतीची थट्टा करायची तिच्या सख्यांना लहर येते.

**सखी १ ली**—( दमयंती आल्याचें पाहिलेंच नाही असें दाखवून. ) बरं काग वासंती ! कुणी फुलांच्या माळा गुंफतात; कुणी रुद्राक्षांच्याही गुंफतात; अन् कुणा रत्नांच्या, नि कुणीऽऽ ( दमयंतीकडे चोरून नजर टाकीत ) अश्रूंच्याही पण गुंफतात माला, हो ! !

**वासंती**—( तशाच तऱ्हेनें, आश्चर्य दाखवीत ) खरं ऽऽ ?

**सखी १ ली**—अग हो ! अन् हें बघ, कुणी देवाच्या नावाची जपमाळ घेतात, तर कुणीऽ ( अगदी ठसक्यानें ) प्रियकराच्या, हो ! ( हसें आवरेनासें होऊन ती हसूं लागते )

**वासंती**—( वात्रटपणें ) खरं हो, देवि !

**दमयंती**—( कृतककोपानें ) मला नाहीं ठाऊक ! !

मोठा हंशा होतो. दमयंती तिथून निघून जाते—

—आणि कांही जणीं गाणीं म्हणत असतात तिथें ती येते. गाण्याचा अर्थ आपला नेहमीचाच असतो:

" प्रियकरा मला तूं आपली कधीं म्हणशील ? हृदयाशी कधीं घेशील ? तुझ्याविरहानें माझे प्राण अगदीं कंठाशीं आले आहेत. आहार, विहार, हे मला

तुझ्यावाचून केवळ विषासारखे आहेत. निद्रेनें माझा त्याग केला आहे. कांही करूं नयेसं वाटूं लागलं आहे. जीवन म्हणजे माझ्या हृदयाला एक भार आहे. तूं मला लवकर आपलीशी केली नाहीस तर फार काळ माझे प्राण या कुडीत राहणार नाहींत."

गाण्याचा अर्थ नेहमीचाच असला तरी, दमयंती येत आहे असें पाहून गाणारी सखी स्वराच्या आणि हावभावांच्या सहाय्याने, आणि दमयंतीकडे मिस्किल पणें पुनः पुनः पाहून गाण्याला एक विशिष्ट अर्थ आणून देतेः तिचे हावभाव अगदी दमयंती सारखे असतातः आणि शेवटी इतकें सगळें पुरेसें न वाटल्यामुळेंच की काय, गाणें संपतांच ती "निषधाधिपा ऽ ऽ" असा टाहो फोडते—आणि सगळ्याजणी दमयंतीकडे पाहून मोठ्याने हंसतात.

**दमयंती**—( रागाने ) हा काय ग फाजीलपणा !

झटक्याने ती झोके घेणाऱ्या सख्यांकडे निघून जाते—हंशाची पुनरावृत्ति होते—

(झोके घेणाऱ्यांपैकीं एक, दमयंतीला, येतांना पाहून) झोके घेतां !

**दमयंती**—( झोपाळा बांधलेल्या झाडाच्या बुंध्याला टेकून ) नको, बाई !

**सखी**—( आर्जवाने ) कांहों ? या, ना !

**दमयंती**—अंहं !

**सखी**—आतां आमच्या बरोबर कशाला बाई झोके घ्याल !

**दमयंती**—( सहज ) कां बरं ?

**सखी**—( ठसक्याने ) तुमच्या त्यांनी झोके दिल्याशिवाय आतां नाहीं बरं वाटायचं. आम्ही काय बाई, कुठल्या झाडाचा पाला.

**दमयंती**—( वरमून ) बरं बाई, येते मी ! चल !

**सखी**—कशाला ? उगीच, देखल्या देवा दंडवत !

**दमयंती**—हें ग काय ? चल ना; खरंच येते मी !

झोपाळ्यावर चढून दोघीही उभ्याने जोराने झोके घेतात.

झोपाळा खूप उंच गेल्यावर सखी दमयंतीला थट्टेने म्हणते.

**सखी**—देवि, तें दूऽर पाहिलंत का, काय दिसतंय्, तें ?

**दमयंती**—( मान उंच करीत, दूरवर नजरेने न्याहाळीत ) कुठं, काय ?

**सखी**—( हंसून ) निषध देश !!

**दमयंती**—( लाजून ) इश्श !!

सगळ्याजणी मोठ्याने हसतात—

—झोपाळा पुनः उंच गेल्यावर—

**सखी**—( साश्चर्य ) अगबाई, राजहंस !

**दमयंती**—( साश्चर्य ) कुठें ?

**सखी**—( त्यांच्याकडेच येणाऱ्या राजहंसांचा तर्जनीने निर्देश करीत ) ते पहा ते ऽऽ!!

( झोपाळा पुनः उंच गेल्यावर )

**दमयंती**—अय्या, खरंच !!

दोघीहि, मोठ्याने,—राजहंस, राजहंस !!

झोपाळा थांबवून, ओरडत, किंचाळत, त्याच उद्यानांत उतरलेल्या राजहंसांच्या दिशेने त्या दोघी धावूं लागतात; त्यांचें पाहून इतरही साऱ्या सख्या तिकडेच धावूं लागतात.—

## ( ३ )

एका कुंजाच्या दिशेने एक हंस धांवत आहे; आणि त्याच्या मागून धांपा टाकीत दमयंतीही धावते आहे. त्या हंसाची धावण्याची पद्धत मोठी मजेदार आहे. तो धावतां धावतां मधेंच मागे वळून पाहतो. दमयंती पुष्कळच मागें राहिली आहे असें दिसल्यास तो आपली गति कमी करतो; थकलों आहे असें दाखवून तो तिला

आपल्या अगदीं जवळ येऊं देतो; आणि ती जवळ येऊन आपणाला धरणार असें दिसतांच तो आपली गति थोडी वाढवितो, व तिच्या हातून निसटून जातो; व पुनः दूर गेल्यावर आपली गति कमी करतो. अशा रीतीने ते दोघेही एका कुंजांत येतात. तिथें येतांच तो हंस दमयंतीकडे तोंड करून उभा राहतो, आणि स्वगतच पण जरा मोठ्याने म्हणतो—

"अहाहा! केवढें अप्रतिम लावण्य हें!!"

दमयंती—( दचकून दोन पावलें मागे सरकून )

अगबाई! कोण रे तूं?

**हंस**—भिऊं नका देवि. मी कुणी राक्षस नव्हे. मी आपला दास आहें. मनुष्यवाणीने बोलण्याचं आम्हा राजहंसांना वरदान आहे देवि! ( दमयंती सुटकेचा एक श्वास सोडते ) निषधाधिप नलराजाचं नांव आपण ऐकलं आहे, देवि?

**दमयंती**—( लाजून ) त्या त्रिलोकसुंदराचं नांव कुणी ऐकलं नाही? ( अधिकच लाजते ).

**हंस**—( मोठ्याने, पण स्वतःशीच ) धन्य! धन्य! ही शची आहे, की रंभा आहे, की उर्वशी! सती आहे की साक्षात् रति आहे? ( दमयंती लाजेनं लवून जाते. ) पण या अमोल रत्नाला कोंदणही तसंच हवं, नाही देवि? (दमयंती स्मित करते ).

**दमयंती**—( विषय बदलण्याच्या हेतूने ) आपण त्या रूपसुंदराविषयीं काय म्हणत होतां?

**हंस**—आपल्याला पाहिलं नव्हतं तोंवर मला वाटत होतं, देवि, कीं तिन्ही लोकांत कुणी सुंदर असेल तर तो एक निषधाधिपच. पण आतां वाटतं की आपलं लावण्य त्यांच्या पेक्षांही अधिक आहे.

**दमयंती**—( लाजून ) कांहीं तरीच!!

**हंस**—छे, पण पुन्हां वाटतं कीं नलराजच अधिक सुंदर आहे. ( निरखुन पहान ) नाहीं, पण आपणच सरस ठराल. छे, छे, आपणा दोघांत अधिक रूपवान

कोण हें कुणालाच ठरवितां येणार नाहीं! एवढं मात्र खरं की आपलं दोघांचंही रूप अतुलनीय आहे!—

**दमयंती**—त्या नरश्रेष्ठाशीं माझी बिचारीची आपण कां बरं तुलना करतां?

**हंस**—(ऐकलें न ऐकलेंसें करून) काय सुंदर जोडा दिसेल हा! ब्रम्हदेवाने खास यांना एकमेकांसाठीच निर्माण केलं असलं पाहिजे.

**दमयंती**—(दीनपणे) कां मला उगीच खोटी आशा लावतां?

**हंस**—आपल्या जन्माचं सार्थक करायचं असेल तर देवि तूं नलराजालाच वर.

**दमयंती**—पण या अभागिनीला ते आपली म्हणतील का? माझं नांव तरी त्यांच्या कानीं गेलं असेल का?

**हंस**—आपलं नांव, देवि, तिन्ही लोकांत गाजतं आहे. मी इथं आहे, असं कस्तुरीला कुणाला सांगावं का लागतं? तिचा सुगंधच तिची कीर्ति दाही दिशांना पसरीत असतो...

**दमयंती**—पण, तरी त्यांना माझ्या विषयीं कांही वाटत असेल, कशावरून?

**हंस**—वाटत असलंच पाहिजे. मी सांगतों ना त्यांचं मन तुमच्यावर बसलं आहे म्हणून!

**दमयंती**—(उत्सुकतेने) खरंच! असं वाटतं तुम्हाला?

**हंस**—नाहींतर मी इथं कसा आलों असतों...पण, तुमच्या मनांत त्यांच्या विषयीं अनुराग आहे ना!

**दमयंती**—(खालीं मान घालून, जवळ जवळ माननेच होकार दिल्याइतकें अस्फुट) हो!

**हंस**—मग झालं तर! असल्या स्त्रीरत्नाविषयीं कांहींच न वाटणारा एक हृदयहीन तरी असला पाहिजे, किंवा षंढ तरी!!

**दमयंती**—पण, समजा नसलं वाटत तर? (लाजते)

**हंस**—तर आनंदानं मी त्यांचं मन तुमच्याकडे वळवायचा प्रयत्न करीन· आपला मात्र निश्चय असूं द्या.

**दमयंती**—हें काय विचारणं !

**हंस**—बरं, येतों मी.

**दमयंती**—ईश्वर तुझं कल्याण करो.

## ( ४ )

## निषधाधिपाच्या वाड्याचा एक सौध

वेळ रात्रीची आहे. पश्चिमेला, आपल्या सौम्य, स्निग्ध, केवळ स्वप्नसृष्टीचा आभास करून देणाऱ्या तेजानें, चंद्रिका सर्व जीवजातांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेत आहे.

एका मंचकावर नलराज उताणा निजला आहे. त्याने आपले हात उशांवर ठेवले असून, त्या हातांवर डोकें टेकलें आहे. त्यानें चंद्रिकेकडे टक लाविली आहे. त्याच्या डोक्यांत विचारांचें चक्र सुरू आहे.

" किती गोड दिसते आहे ही चंद्रकोर. साऱ्या ताऱ्यांचं लक्ष जणूं तिच्याकडे लागलं आहे. तिच्या मनांत भरावं म्हणून प्रत्येकाची केवढी तरी धडपड चालली आहे......ती वैदर्भी जर हिच्या इतकीच लावण्यवती असेल तर तिन्ही लोकांतील पुरुषांचीं मनें तिच्या आशेने अशीच स्फुरत असतील.......बाकी, मित्र असावा तर असा ! राजहंसा, तुझे उपकार जन्मो-जन्मींहीं फिटणं शक्य नाहीं.......किती कुशलतेने त्याने माहिती आणिली ! " तुमच्या मनांत त्यांच्या विषयी अनुराग आहे ना ! " वा ! वा ! राजहंसा, तुझी धन्य आहे.......खरोखर, अशा स्त्री रत्नाचं मन माझ्यावर जडावं हें माझं केवढं भाग्य ! खचित, देवांनाही माझा हेवा वाटेल......"

अशा प्रकारें विचार करतां करतां त्याला झोंप लागते......

# ( ५ )

## विदर्भराज भीमाच्या प्रासादांतील एक दालनः—

राजा भीम एका उच्चासनावर बसला असून त्याच्या जवळच, खाली मना घालून दमयंतीही बसली आहे. राजाच्या मागें, उच्चासनाला टेकून, राणी उभी आहे. बाजूला, केशिनी, वासंतिका, पुष्पा वगैरे उभ्या आहेत.

**राणी**—ऐकलं, का !

**भीम**—काय ?

**राणी**—म्हटलं, आतां दमयंतीचं लग्न करायला हवं !

**भीम**—तुम्हाला एवढी घाई कां तिच्या लग्नाची ? करायचंय काय इतक्यांत तिचं लग्न करून ?

**राणी**—( तोंडाला पदर लावून, हंसत ) इश्श ! " करायचंय् काय ! " म्हंजे काय ! अन् " इतक्यांत " म्हंजे काय ? मुलगी एवढी वाढली तरी यांचं आपलं, " इतक्यांत " आहेच.

**भीम**—( दमयंतीच्या पाठीवरून हात फिरवून, तिची हनुवटी धरून, तिचें मुख आपल्याकडे वळवीत, थट्टेने ) होय ग, दमयंती ! " एवढी " मोठी झालीस तूं ! करूं तुझं लग्न ?

( दमयंती, " इश्श ! " म्हणून लाजेने तिथून निघून जाते. तिच्याकडे बघत स्वतःशींच पण जरा मोठ्याने ) मला तर अजूनही तो दुडुदुडु धांवणारी अन् बोबडं बोलणारीच दमयंती दिसते आहे......तिला माझ्या एवढ्या मोठ्या राजवाड्यांत काय कमी आहे, म्हणून तिला लग्नाची इच्छा व्हावी ?

...या आयांचं काय, मुलगी जन्मली नाहीं तोंच तिच्या लग्नाच्या गोष्टी सुरू.

**राणी**—( ठसक्याने ) नि इकडे बघावं तर वयांत आलेली ही मुलगी अगदी कुक्कुलं बाळ वाटते आहे ! इश्श ! निरखुन बघावं जरा, कशी वाळत चालली आहे पोर ती.

**भीम**—खरंच, कां बरं वाळत चालली ही मुलगी ?

**राणी**—आपणही तरूण होतात म्हटलं एकदां! आठवावं जरा! वयांत आलं म्हणजे कुणालाही वाटतं आपलं लग्न व्हावंसं.

**भीम**—हात्तिच्या! मग तिने आम्हाला कां नाही सागूं तसं!

**राणी**—काय तरी बाई!...आपल्या तोंडानं कसं सांगेल, माझं लग्न करून द्या म्हणून ?

**भीम**—कां आम्ही कुणी परके आहोंत होय ?

**राणी**—तसं नव्हे! पण भीड, मर्यादा कांही असतेच कीं नाहीं माणसाला? अन् किती झालं तरी आर्यकन्या आहे ती! रीत कशी सोडील ?

**भीम**—(दमयंतीच्या सख्यांकडे वळून) होय, ग ? तुम्हालाही असंच वाटतं ? (सख्या मानेनेच होकार देतात) कशावरून ?

**केशिनी**—राजकन्या किती वाळली आहे तें आपण पाहिलंच. कितीतरी दिवसांपासून राजकन्येचं मन अगदीं अस्वस्थ आहे. आणि परवां राजहंस दिसल्यापासून तर त्या अगदींच कांहींतरी वागूं लागल्या आहेत...

**भीम**—यांत राजहंसाचा काय संबंध ?

**राणी**—(केशिनीला डोळ्यांनी दटावीत) संबंध कसला! कांहींतरी निमित्त लागतं मनाला!

**केशिनी**—आजकाल खाणं तर त्यांना बहुधा नकोच असतं; कपडेलत्ते, अलंकार देखील नकोत. खेळ, विहार, अगदीं आवडेनासे झाले आहेत. सदान्कदा, आपलं कुठेंतरी एकांतांत जाऊन विचार करीत बसायचं, नि अश्रू गाळायचे, नि सुस्कारे सोडायचे. रात्रींचं देखील असंच धड झोंपत देखील नाहींत.

**भीम**—(दुःखद स्वराने) अरेरे! मला काय ठाऊक असं कांहीं असेलसं! माझं आपलं भाबडं मन, मला तर ती अजूनही लहानच दिसे. तिच्यावरील माझ्या स्वार्थी प्रेमामुळें मला, पिता या नात्यानं असलेल्या माझ्या कर्तव्याचाही विसर पडला! असो. आतां तिचं लग्न उरकलंच पाहिजे.

**राणी**—( लडिवाळपणें ) मी एक जांवई देखील शोधून ठेवला आहे.

**भीम**—हं !!

**राणी**—तर !!

**भीम**—पण तिला तो पसंत असला पाहिजे ना ?

**राणी**—इश्श, पसंत न पडायला काय झालं ! अगदी अश्विनी कुमारा-
सा आहे हो तो निषधाधिप ! मी तर म्हणतें, दमयंतीच्याही मनांत त्याच्याच
ारांनी ठाणं दिलं असावं.

**भीम**—कशावरून म्हणतां तुम्ही हें ?

**राणी**—एक तर, मदनासारख्या रूपामुळें सगळया जगभर त्याचं नांव
आहे. शिवाय, आम्हीही त्याच्याविषयीं कधींमधीं तिची थट्टा करीत असूं.
ली मुलगीही लोकोत्तर रूपवती म्हणून प्रसिद्धच आहे. आम्हां तिऱ्हाइतांच्याही
त त्यांचा जोडा जमावा असं येतं, तर तिच्याही मनांत तेच विचार घोळत
ल्यास काय नवल ? खरं ना, केशिनी ?

**केशिनी**—हं.

**भीम**—ठीक आहे. असंच असेल तर मग तिचं स्वयंवरच होऊं द्या.
ांच्या आत्तां मी चारही दिशांना दूत रवाना करतों.

## ( ६ )

विदर्भराज भीमाच्या आज्ञेने, उत्तम पोषाख केलेले असे अनेक घोडेस्वार,
म्हणून, कुंडिनपुराच्या चारही वेशींतून बाहेर पडले. त्या दूतांनी आपल्या-
ोच आपल्या अश्वांनाही मोठ्या उत्साहानें सजविलें होतें. स्वतःप्रमाणेंच
याही गळ्यांत ताज्या फुलांच्या माळा घातल्या होत्या; पायांत फुलांचेच तोडे
ले होते. डोक्यांवर, कानांमधोमध, फुलांचे गुच्छ बांधले होते. गळ्यांत,
ठ ध्वनी करणारी घुंगुरें, अथवा घंटिकांच्या माळा घातल्या होत्या. आणि

मोठ्या ऐटबाज चालीने ते आपापले घोडे दौडवीत होते; आणि मधून मधून विदर्भराज भीमाच्या नांवाचा जयघोष करीत होते. हातीं धरलेल्या भाल्यांना लावलेल्या पताकांनाही त्यांनी स्वयंवरसूचक माळांनी भूषविलें होतें.—

राजधानींत जिकडे तिकडे आनंदाचें साम्राज्य होतें; नगरवासी, उत्साहानें आपापली घरें, आणि पर्यायाने ती सारी नगरी, सुशोभित करीत होते. उत्तमोत्तम पोषाख करून सुहास्य वदनाने नागरीक आपापली नित्यकर्में करीत होते.

हळुहळू, देशोदेशीचे, दूरदूरचे, राजेमहाराजे कुंडिनपुराच्या आसमंतात आपापल्या सैन्यासह आणि परिवारासह येऊन छावण्या ठोकूं लागले. राजधानींत परप्रांतीय लोकांची आणि सैनिकांची मोठी दाटी माजून राहिली. त्या अनेक राजांच्या हत्तींच्या गर्जना, घोड्यांचें खिंकाळणें, आणि रथांचा गडगडाट यांनी सर्व पृथ्वी भरून जाऊं लागली. त्या विविध राजांच्या सैनिकांनी आपापल्या देशांच्या रिवाजाप्रमाणें विविध आणि चित्रविचित्र माला आणि अलंकार धारण केले होते. असे ते त्या नगरींतून हिंडत, तेव्हां त्या नगरीला त्यांच्यामुळें एक विचित्र शोभा आली होती.

भीम राजा त्या सर्व राजांचा यथायोग्य आदरसत्कार करी.

## ( ७ )

## देवेंद्राचे मंदिर

देवर्षि नारद आणि पर्वत हे एका उच्चासनावर बसलेले असून त्यांच्या समोर हात जोडून नम्रभावाने देवेंद्र उभा आहे. जवळच असलेल्या उपकरणांवरून, ऋषींची पाद्यपूजा नुकतीच आटपल्याचें स्पष्टच दिसतें आहे.

**इंद्र**—( नम्रपणें ) देवर्षि हो, आपलं कुशल आहे ना ? पृथ्वीतलावरील सर्व राजांचंही ठीक चाललं आहे ना ?

**नारद**—देवेंद्रा, तुझ्या क्षात्रतेजामुळें आमचें आणि पृथ्वीतलावरील राजांचेंहि कुशल आहे.

**इंद्र**—( सविनय ) छे, छे ! माझ्यापेक्षां आपल्या बाह्यतेजाचाच प्रभाव आहे हा. ..( थोडें थांबून ) हो, बरी आठवण झाली. आजकाल इथें एकही क्षत्रिय राजा येतांना दिसत नाहीं, असं कां ? मृत्युलोकींचीं युद्धं बंद झालीं की तेथें क्षत्रियच उरले नाहीत ?

**नारद**—देवेंद्रा, पूर्वीचे ते दिवस गेले आतां.

**इंद्र**—कां बरं ?

**नारद**—समरांगणांत पतन पावल्यावर मिळणाऱ्या स्वर्गीय अप्सरा आणि सुखें यांची त्या राजांना क्षिति वाटेनाशी झाली आहे आतां.

**इंद्र**—असं ! !

**नारद**—अरे, त्रिलोकसुंदर अशी विदर्भराजकन्या पृथ्वीवर असतांना मरणोत्तर मिळणाऱ्या स्वसुंदरींच्या आशेने कोण आपले प्राण धोक्यांत घालील ?

**इंद्र**—काय, विदर्भाच्या राजकन्येचं लावण्य खरोखरच इतकं अप्रतिम आहे ?

**नारद**—तर ! उगीच का विदर्भाच्या राजधानीकडे जगांतल्या साऱ्या राजांची एवढी रीघ लागून राहिली आहे ?

**इंद्र**—म्हणजे ? तें कां ?

**नारद**—विदर्भराज भीमानं आपल्या कन्येचं स्वयंवर मांडलं आहे म्हणून ! देवेंद्रा, खरोखर, असलं स्त्रीरत्न साऱ्या त्रिभुवनांत शोधून सांपडणार नाही!...

**इंद्र**—( अग्नि, वरुण, आणि यम हे लोकपाल येतात त्यांस उद्देशून ) यावं ! यावं ! बरे वेळेवर आलांत. या देवर्षींच्या मतें विदर्भराज भीमाच्या कन्येचं रूप स्वर्गांतल्या अप्सरांनाही लाजविणारं आहे. आणि त्या भीमानं तिचं स्वयंवर मांडल्यामुळेंच आजकाल मृत्युलोकींचे राजे इथें येण्याची कामना धरीत नाहींत.

**तिघेही लोकपाल**—काय म्हणतां ? असली लावण्यमयी पृथ्वीवर खरोखरच विद्यमान आहे ?

**इंद्र**—होय ! आणि लौकरच तिचं स्वयंवरही होणार आहे.

**वरुण**—स्वयंवर ? मग आपणही तिथें कां जाऊं नये ?

**अग्नि**—बरोबर !!

**यम**—चला तर मग, आपणही तिकडेच जाऊं या.

**इंद्र**—चला.

## ( ८ )

एका दिव्य विमानांत बसून इंद्र, वरुण, अग्नि आणि यम हे जात आहेत.

**इंद्र**—वरुणा, तो विदर्भ देश पाहिलास का ? आणि तें बघ कुंडिनपूर ! मुंग्यांची रीघ लागल्याप्रमाणें, चारही दिशांनी कुंडिनपुराकडे धांव घेणाऱ्या राजांच्या रथांचीच ही रांग दिसत असावी.

**वरुण**—होय ! खास ही रथांचीच रीघ. आणि तो त्या निषधाच्या बाजूनें येणारा एकच एक अति वेगवान् रथ, कुणाचा बरं असावा ?

**अग्नि**—अश्वविद्याविशारद, उदारधी, निषधाधिपाचाच तो रथ असला पाहिजे.

**इंद्र**—लोकपालांनो, दिव्य दृष्टीनें, जरा निरखून त्या निषधाधिपाकडे एकदा बघा तर खरे.

**वरुण, अग्नि व यम**—( एकदम, एका पाठोपाठ ) अहाहा ! काय हें लावण्य ! मूर्तिमंत मदनच जणूं !

**इंद्र**—खरोखर, आम्हा रूपगर्वित देवांनाही याच्या या अलौकिक रूपाने लाजविलं.

**वरुण**—खरं आहे ! याच्यापुढें आमचा काय पाड लागणार !

**अग्नि**—अशा परिस्थितींत स्वयंवरार्थ न जाणंच बरं !

**यम**—चला, परतुं या ! तिथें जाऊन आपली शोभा करून घेण्यांत अर्थ नाहीं.

**इंद्र**—छे ! छे ! तें शक्य नाही ! हातीं घेतलेलं काम अर्धवट सोडण्यांत काय पुरुषार्थ आहे ! मी सांगेन तसें वागाल तर खचित आपला कार्यभाग होईल.

**वरुण**—ठीक ! तुमच्या म्हणण्याप्रमाणें होऊं द्या.

**इंद्र**—उत्तम ! ( खालीं नलाकडे पाहून, हाताने थांबण्याची खूण करीत ) निषधाधिपा, थांब ! ( देवांकडे वळून ) चला, माझ्याबरोबर.

( ९ )

नल राजाचा रथ अतिवेगाने चाललेला असतो; आणि नलही मनोरथांत गुंग झालेला असतो. इतक्यांत त्याला आकाशांतून, "निषधाधिपा थांब" अशी हांक ऐकूं येते. दचकून, तो वर पाहतो; आणि रथ आंवरून घेतो. रथ थांबतो न थांबतो तोंच रथा समीप उभे असलेले लोकपाल त्याला दिसतात.

**नल**—( लोकपालांस ) आपण मला हांक दिलीत ?

**इंद्र**—होय.

**नल**—मी आपलं कोणतं प्रिय करूं शकतों ?

**इंद्र**—निषधाधिपा आम्हाला तुझ्या सहाय्याची अपेक्षा आहे.

**नल**—आपण कोण ?

**इंद्र**—मी इंद्र, हा अग्नि, हा वरुण, आणि हा यमधर्म.

**नल**—( सर्वांना लवून वंदन करीत ) देवांनाही सहाय्य नाकारील असा कोण मर्त्य आहे ? शिवाय हा वीरसेनपुत्र, मदतीची याचना करणाराला विन्मुख करीत नसतो.

**वरुण**—म्हणून तर आम्ही तुझ्याकडे आलों.

**अग्नि**—पण खरोखरच तूं आम्हाला सहाय्य करशील का ?

**नल**—निषधाधिप आपले शब्द परत घेत नसतो.

**यम**—तुझी सत्यनिष्ठा ऐकूनच तर तूंच आमचा दूत होण्यास योग्य आहेस असें आम्ही ठरविलें.

**नल**—ठीक ? पण आपलें एवढें काम तरी कोणतें ?

**इंद्र**—निषधाधिपा, माझ्या सर्वभेदी वज्रालाही कठीण, या तेजःपुंज, सर्व-भक्षक अग्नीलाही दुर्घट, या वरुणाला आणि या यमधर्मालाही दुष्कर असं एक महत्वाचं काम उद्भवलं आहे. तुझी सत्यनिष्ठा आणि तुझं धैर्य हीं सर्वविश्रुत आहेत. केवळ तुझ्याच हातून हें काम होईल असें समजून तुझ्या मदतीची याचना करायला आम्ही तुझ्याकडे आलों आहोंत. तेव्हां आतां तूं तरी आमची निराशा करूं नकोस.

**नल**—( आवेशाने ) मी अगदी निक्षून सांगतों कीं मी आपलं कार्य करीन !

**यम**—यांत फरक होणार नाही ?

**नल**—नाही ! नाही ! त्रिवार, नाही ! !

**इंद्र**—ठीक, ठीक ! नला, आतां आमचं काम ऐक. विदर्भराज भीमाच्या कन्येचें स्वयंवर आहे; तेव्हां त्या दमयंतीकडे जाऊन तूं तिचें मन आमचेकडे वळीव; तुलाच तें शक्य आहे.

**नल**—( क्षणभर स्तंभित होऊन, सक्रोध ) तें शक्य नाही ?

**अग्नि, वरुण, यम**—( एकदम ) काय ? ?

**नल**—हें काम मी करूं शकणार नाही ! !

**इंद्र**—( आवेशाने ) कां ? कां, करूं शकणार नाही ?

**नल**—मीहि स्वयंवरार्थच विदर्भाला जातों आहे. दमयंती मला प्राणांहूनही प्रिय आहे. तेव्हां तिचें मन वळविणें मला शक्य नाही. असलें काम कोणताही प्रियकर करायला धजणार नाही.

**इंद्र**—नला, तूं कुणाशीं बोलतो आहेस यांची तुला शुद्ध दिसत नाही. अरे या सर्व भक्षक अग्नि देवाकडे जरा बघ. अरे, हा कोपला तर कुणाची धडगत आहे ? क्षणार्धांत साऱ्या विश्वाला भस्मीभूत करणाऱ्या या अग्निला तूं डिवचूं नकोस अग्नीशीं वैर करणं बरं नव्हे. सारं विश्व याला भीतं हें लक्षांत आण.

( इंद्र बोलत असतां अग्नीचें रुद्ररूप आणि त्याच्या विक्राळ लीला त्याला दिसूं लागतात. )

**नल**—( हांसत ) वीरसेनपुत्राला भीति ठाऊक नाहीं !

**इंद्र**—आणि हा वरुण ! प्रयलकाली सारं विश्व हा आपल्या अनंत उदरांत गडप करतो.

( जिकडे तिकडे मुसळधार पाऊस पडून पाणीच पाणी झाल्याचें भयानक दृश्य नल राजास दिसतें. )

**नल**—असलें काम करण्यापेक्षां प्रलयाच्या उदरी कायमचं गडप होणं मला परवडेल.

**इंद्र**—आणि, हा यमधर्म ! अरे, वेड्या, साऱ्या विश्वाचे कारभार केवळ याच्या लहरीनं चालतातः विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय, साऱ्या जीव-जाताचे मृत्यु, बाल्य, यौवन आणि वार्धक्य, संवत्सरांचे वसंतादि मागे ऋतु, दिवस आणि रात्री, प्रहर, घटिका आणि क्षण, या साऱ्या गोष्टी, नला, या यमधर्माच्या मर्जीवर अवलंबून आहेत. अरे हा अनादि अनंत कालच प्रत्यक्ष तुझ्या समोर उभा आहे. देवांनीहि याला नेहमी आदराने वंदनच केलं आहे. हा रागावला न निमिषार्धातच तुझ्या साऱ्या आशाइच्छांचा आधार असें हें तुझें काम्य शरीर नाहीसें होईल.

( इंद्राचें भाषण चालू असतां यमधर्माचा भीतिप्रद प्रताप नलाच्या नजरेस येतो–एका मागून एक अशीं अनेक दृश्यें त्याच्या डोळ्यासमोर येतात ).

**नल**—( गंभीरपणें ) होऊं दे, त्याची मला पर्वा नाही !

**अग्नि**—अरे मूर्खा, आम्हां सर्वांना वाकविणारा हा देवाधिदेव इंद्र, याच्या वज्राचें नांव तूं ऐकलें नाहीस का ?

**वरुण**—याला दुखवून तूं काय मिळवूं इच्छितोस ?

**यम**—देवाधिदेवाच्याही विरुद्ध तुला उभें राहवतें तरी कसें ?

**नल**—( साभिमान ) देवाधिदेवाची मला भीति नाहीं. सगळ्या देवांचाहि कोप झाला तरी त्याची मला पर्वा नाहीं. ज्याची प्रीति विशुद्ध नसेल त्यालाच अग्नीचं भय; अग्नि दिव्यानं माझी प्रीति तर सुवर्णाप्रमाणे अधिकच उजाळेल. या वरुणाच्या प्रलयाची भीति मला दाखवूं नका. आणि या मर्त्य शरीराचीच हा यमधर्म मला भीति घालीत असेल, तर तेंही खुशाल घेऊन जा म्हणावें. जे केवळ शरीरावरच प्रेम करतात त्यांनाच यमराजाची भीति. माझी प्रीति तर अमर आहे. यमधर्म मला जिंकूं शकत नाही. आणि देवेंद्रा......

**इंद्र**—( त्राग्याने ) पुरे, पुरे ! दिलेला शब्द पाळण्याची हिंमत नाही पण वल्गना किती ?

**अग्नि**—वचनभंगाने स्वकुलाच्या कीर्तीला कलंक लावणाराला एवढा तोरा !

**वरुण**—आणि तोही देवांना दिलेल्या वचनाचा भंग !!

**यम**—आणि अशाला दमयंती माळ घालील ?

**इंद्र**—आणि हा कुलांगार उजळ माथ्याने स्वयंवर मंडपांत जाऊं शकेल ?

**अग्नि**—याला तिथें जायला तोंड कुठें आहे ! वीरसेनपुत्रा, आपला रथ निषधाकडे वळीव.

**नल**—( उद्वेगाने, कान झांकून घेत ) नको ! नको !..." वीरसेनपुत्र खोटा, खोटा " अशी अपकीर्ति या कानांनी ऐकण्यापेक्षां, दुसरें कोणतेंहि दिव्य मी पत्करीन. ( थोडें थांबून, कांहीं निश्चय केल्यासारखें ) तुम्ही म्हणतां तसेंच कां होईना. माझें प्रेम खरें असेल तर यांतूनही मार्ग निघेल.

**इंद्र**--( घाईने ) जा ! जा ! तर मग !

**नल**—( एक पाय रथाच्या चाकावर आणि दुसरा जमिनीवर अशा स्थितीत मागें वळून पहात ) हा निघालोंच मी !! ( थोडें थबकून ) पण, राजमंदिरावर फारच कडक बंदोबस्त आहे म्हणतात...

**इंद्र**—( झट्कन् पुढें होऊन ) त्याची काळजी नको. ही मुद्रिका घे, तुला कोणीहि अडविणार नाहीं.

( १० )

दमयंतीच्या मंदिराच्या द्वारावर एक वृद्ध पहारेकरी उभा आहे. त्याला हतांच नल ती देवेंद्राने दिलेली मुद्रिका पूज्य भावाने मस्तकास लावतो आणि ई चालूं लागतो. नल त्या पहारेकऱ्याच्या अगदीं डोळ्यांसमोरून जातो, पण द्रिकेच्या प्रभावानें त्याच्यासमोरून कोणी मंदिरांत गेलें हें पहारेकऱ्यास दिसत हीं; व तो तसाच निश्चिंतपणें उभा राहतो.—

—नल दरवाजांतून दोन चार पावलें आंत जातो न जातो तोंच मंदिरांतून, दर नक्षीदार रुमालानें झांकलेलें एक ताट घेऊन, एक दासी घाईघाईने येत सते. आपल्याच नादांत असलेल्या नलाचें तिकडे लक्षच नसल्यामुळे त्यांची गदी टक्कर होण्याची पाळी येते, पण सुदैवाने त्याच क्षणीं नलाची दृष्टि त्या सीकडे गेल्यामुळे तो दचकून एकदम बाजूला होतो. या एकंदर प्रकाराची त्या- सीला कांहीच कल्पना नसते—कारण नल अदृश्य असल्यामुळे तिला तो दिसत ही—आणि त्यामुळे ती आपल्याच नादांत झपाट्याने बाहेर निघून जाते. तो द्ध पहारेकरी आणि ती दासी नेहमीच्या ओळखीने एकमेकांकडे पाहून स्मित रतात. इकडे नल मात्र त्या दासीकडे बघत स्वतःशीच पुटपुटतो.

" अरे, बापरे! केवढा घात होत होता! वेळीच लक्षांत आलं हें सुदैवच णायचं; नाहीतर लोकपाल म्हणायचे, तूं मुद्दामच धक्का देऊन गौप्यस्फोट केलास णून."

नल पुढें चालूं लागतो.—

( ११ )

एका दालनांत कांही जणी फुलांच्या माळा गुंफत बसलेल्या दिसतात. ांना पाहून, त्या दालनांत शिरतां शिरतां, नल स्वतःशीच पुटपुटतो, " आतां :शंकपणें प्रकट व्हावं;" आणि मुद्रिकेला पुनः वंदन करतो. दालनांत नल ारतांच त्या स्त्रियांचें लक्ष त्याचेकडे जाऊन त्या लगबगीने उभ्या राहतात: ांहींच्या हातून माळा गळून पडतात, कांहींचे हात माळा गुंफता गुंफता जसेच्या

तसेच राहून जातात; कांहींना उभं रहायचं न सुचल्यामुळे त्या तशाच जागच्या-जागीं थबकतात; तर कांही अर्धवट उठलेल्या स्थितींतच रहतात. सगळ्यांचे डोळे नलाच्या असामान्य सौंदर्यानें दिपून जातात.—क्षणभर, आपण एका परपुरुषाकडे टक लावून पहात आहोंत याचेंही त्यांना भान रहात नाहीं. सगळ्यांच्या दृष्टींतून जणू एकच भाव प्रकट होत असतो; "काय हें सौंदर्य !" आणि मग, आपली चूक लक्षांत घेऊन ओशाळल्यामुळें त्यांचे डोळे खाली वळतात, आणि विचलित चित्तानें व कापऱ्या हातांनीं त्या पुनः आपापली कामें सुरू करतात; आणि पुढें गेलेल्या नलाच्या पाठमोऱ्या आकृतीकडे, न कळत, पुनः पुनः सकौतुक दृष्टिक्षेप करीत असतात.

नल आणखी थोडा पुढें जातो तों डाव्या हाताला दमयंतीच्या पोषाखाची, तयारी करीत असलेल्या कांही जणी त्याच्या दृष्टिपथांत येतात, आणि काय सांगावें, त्याच वेळीं, जणूं अंतःस्फूर्तीनेंच त्यांचेंही तिकडेच लक्ष जातें; कपडा झटकायला वर गेलेले हात तसेच राहून जातात; उमलत्या कळीप्रमाणें ओष्ठांचे संपुट किंचित् विलग होतें आणि आश्चर्यानें नयनें अनिमेष होतात.—चंद्रासारखा हंसऱ्या चेहऱ्याचा तो नल, त्यांच्याकडे हंसऱ्या डोळ्यांनी पहात पुढें, पुढें चाललेला असतो. त्याची पाठ वळतांच "काय हें साहस !" "हा वीर कोण असावा बरं !" "हा, काय देव !" "कीं यक्ष!" कीं गंधर्व !" असे अनेक आश्चर्योद्‌गार त्या स्त्रियांच्या तोंडून बाहेर पडतात—नकळतच निघालेल्या या शद्बांपुढे भाषणाची मजल जात नाहीं, कारण पुढें लज्जेचा प्रदेश असतो, आणि विनयानें दृष्टी खालीं वळते.—

## ( १२ )

एका उच्चासनावर दमयंती बसलेली असून तिची एक सखी तिचे लांबच लांब केस उभ्यानें विंचरीत असते. आणि दमयंती खालीं पहात आपल्या पायाच्या बोटांशीं हाताच्या बोटांनी चाळे करण्यांत दंग असते. तिच्या समोरच दुसरी एक सखी विडा लावीत बसलेली असते.—

—अशा त्या दमयंतीला दुरून पाहतांच नलाचें भान हरपतें, आणि तो एखाद्या गुंगींत असलेल्या माणसासारखा चालूं लागतो.—

—तो जवळ येतांच विडा लावणाऱ्या त्या सखीच्या तो प्रथम नजरेस येतो, आणि तिचे काम तसेंच राहून जातें, आणि " अय्या ! " असा आश्चर्योद्गार करीत ती गडबडीने उभी राहते.

—आणि, स्त्रीपुरुषांना परस्परांचा वास येतो की काय कुणास ठाऊक, पण अगदीं त्याच वेळी दमयंतीचेही नलराजाकडे लक्ष जातें; आणि तीही " अगबाई ! " म्हणत लगबगीने, उभी राहते—ती इतकी गडबडते की अस्ताव्यस्त झालेल्या आपल्या कपड्याचेंही तिला भान उरत नाहीं. नलाच्या सौंदर्याने मोहित होऊन अनिमेष नेत्रांनी दमयंती त्याच्याकडे पाहूं लागते क्षणार्धांत तिच्या मनांत पुढील विचार डोकावून जातात.

" हा मदन सुंदर कोण बरं असेल ? नलराज तर नव्हे ना ? कीं ही माझ्या मनाचीच माया ? छे, पण माझं मन ज्यांना ओळखतं ते हेच !! मनोभवरूप निषधाधिपच हे ! "—

—अन् मग तिचे डोळे हसूं लागतात, हळुहळू किलकिले होतात; ओठावर स्मित विलसूं लागतं—मनाला मनाची ओळख पटल्याचं, समाधानाचं, स्वागताचं, आतुरतेचं, अधीरपणाचं, स्वर्गानंदाचं तें स्मित एकदम झळकतं. त्या स्मिताला तसल्याच स्मिताने उत्तर मिळतं; नल राजाच्याही मनांत, नेत्रात दमयंतीच्याच भावनांचं प्रतिबिंब क्षणभरांत उमटून जातं. दुसऱ्याच क्षणी दमयंतीच्या मनावर लज्जेचा पगडा बसून वस्त्रें सावरता सावरतां तिची नजर खाली वळतें. पण, लगेच स्वतःला सांवरून घेऊन उत्कटतेने ती नलराजाशी बोलूं लागते :

" देवासारखे आलांत आपण !! माझ्या आशा बहरल्या !!

( थोडें थांबून, साश्चर्य )

पण, आपल्याला कुणी पाहिलं नाहीं ? अडविलं नाहीं ??

विचारलेल्या प्रश्नांच्या उत्तरासाठीं अधीर होऊन ती उत्तरें " ऐकण्यासाठीच जणू ती नलाकडे किंचित् लवते.

**नल**—( हंसून ) मी कुणी देव नव्हे ! तरीपण देवांच्या कृपेमुळेच हा निषधाधिप इथवर येऊं शकला, एवढं खरं !

( गोंधळलेल्या मुद्रेने दमयंती नलाकडे पाहूं लागते, तेव्हां मनाचा कांहीं एक निश्चय केल्यासारखा दृढस्वराने नल पुढें बोलूं लागतो ).

हा निषधाधिप देवदूत म्हणून आपल्याकडे आलेला आहे.

**दमयंती**—म्हणजे ?

**नल**—इंद्र, वरूण, अग्नि आणि यमधर्म यांना आपल्या प्राप्तीची इच्छा आहे.

**दमयंती**—( हंसून ) माझ्या ? ? ?

**नल**—आणि म्हणून आपलं मन वळविण्यासाठी त्यांनी माझी निवड केली.

**दमयंती**—छान ! ! आणि आपण कबूल केलंत ! !

हें ऐकतांच नलाचा चेहरा एकदम उतरून जातो, तरी स्वतःला सावरून धरीत तो बोलूं लागतो—

" त्या देवांच्या पायाच्या धुळीचीही सर मला येणार नाहीं......

**दमयंती**—( कडवटपणें ) शतशः प्रणाम असोत त्या देवांना ! !

**नल**—( आपलेंच घोडें दामटीत ) धुळीचा स्पर्शही नसलेली वस्त्रें, कधीही न कोमेजणाऱ्या स्वर्गीय पुष्पाच्या माळा, आणि इतरही अनेक स्वर्गीय सुखांचा तुला लाभ होईल.......आणि रूपसुंदर देव तुझे दास होऊन राहतील......"

**दमयंती**—(रागाने बेभान होऊन) त्या देवांना अप्सरा पुरेशा नाही झाल्या ?

**नल**—(दमयंतीचा राग पाहून त्याला आनंदच होत असतो; पण कटु कर्तव्य करावें लागल्यामुळें दुःखही होत असतें. अशा द्विधा मनःस्थितीत तो म्हणतोः) असल्या त्रिलोकसुंदर रत्नाचा कुणाला मोह पडणार नाहीं ! ! ( दमयंती एकदम एकदम थोडी लाजते, त्याचा फायदा घेऊन ) क्षणार्धात या पृथ्वीलाच नव्हे तर साऱ्या विश्वालाही भस्मसात् करणारा साक्षात् अग्निदेव तुझ्यासाठीं आतूर आहे; ज्याच्या केवळ धाकाने सारी जीवसृष्टि आपल्या धर्माप्रमाणे वागते तो यमधर्मही तुझ्या

पाणिग्रहणासाठी उत्सुक आहे, आणि क्रूर दैत्यदानवांचा संहार करणारा देवांचाही देव तुझ्या प्राप्तीची इच्छा करतो आहे... ...

**दमयंती**—( उद्वेगाने कान झांकून घेत ) पुरे, पुरे!! आपल्याला वेड तर नाहीं लागलं?......

**नल**—ते लोकपाल तुझ्यासाठी वेडे झाले आहेत... ...

**दमयंती**—( डोळ्यांत पाणी आणून ) काय! काय ऐकते आहे मी हें? माझं डोकं तर नाहीं फिरलं? मी जागी आहे, की स्वप्नच आहे सारं हें?

**नल**—माझ्यासारख्या एका यःकश्चित मानवाकरितां तूं लोकपालांचा अव्हेर करूं नकोस...

**दमयंती**—आपण थट्टा तर नाही करीत?

**नल**—( स्वतःशी, सखेद ) असली प्राणघातक थट्टा कोण करील!!

**दमयंती**—( घाबरून ) की आपल्यालाच मी नकोशी झालें? ( एकदम उठून, दोन पावलं पुढें होऊन ) आपल्याला म्हणावं तरी काय! आपल्या आशेवर तर हें स्वयंवर आरंभलं. आपणच मला नाकारलंत तर मी विष खाईन, जाळून घेईन, गळ्याला फांस लावीन! मग जगून तरी काय करूं मी? लग्न करीन तर आपल्याशीच; मग देवांचा राग होवो की आणखी कांही होवो. ( दुःखाने तोंड झांकून घेते आणि थरथर कापूं लागते. )

**नल**—( सगद्गद ) पुरे, पुरे! तुझ्या अश्रूंनी माझ्या काळजाला घरें पडत आहेत. दिलेल्या वचनाला जागण्यासाठीच मला हें सारं दिव्य करावं लागलं. आतां मला कोणी बोल लावूं शकणार नाहीं...(थोडे थांबून) देवि माझं मन मी तुला कसं उकलून दाखवूं? तुझ्यापुढें कुबेराचंही ऐश्वर्य मला तुच्छ आहे. देवांच्याही रोषाचं मला भय नाहीं! पण, यांतून मार्ग कोणता? मला सुचत नाही! देवाना मी काय सांगूं?

( कांहीं वेळ दोघंही विचार मग्न व स्तब्ध असतात. )

**दमयंती**—आहे, एक उपाय आहे. ( " तो कोणता " या अर्थी नल दमयंतीकडे

पाहतो.) आपल्याप्रमाणेच लोकपालांनीही स्वयंवर मंडपांत यावं. त्यांच्या समक्षच स्वयंवर झालें म्हणजे कुणालाच दोष नको.

(हें बोलतांना दमयंती अशा रीतीनें पाहून स्मित करते की ही खास आपल्यालाच वरणार अशी नलाची खात्री होते; आणि तो अत्यंत हर्षानें व कौतुकानें तिच्याकडे पहात राहतो.—दमयंतीची नजर भूमीकडे वळते.

## ( १३ )

स्वयंवराचा पोषाख करून दमयंती एका उच्चासनावर बसली असून तिचा चेहरा आणि तिची एकंदर हालचाल यांवरून ती फारच अस्वस्थ आहे हें सहजच कळण्यासारखें आहे: मधेंच ती सखीला पंख्यानें वारा घालायला लावते; लगेच तिच्या जवळून पंखा हिसकून घेऊन स्वतःच वारा घेऊं लागते; थोड्या वेळानें "तूंच घाल बाई" म्हणत तिच्याच हातीं पंखा देते; तर लगेच "पुरे बाई" म्हणून पंखा बंद करविते. एकदां आसनावरून उठून गवाक्षांतून दूरवर उदासपणें पहात उभी राहते, तर थोड्याच वेळांत एक दीर्घ निश्वास सोडून पुनः जड पावलांनीं परत येऊन आसनावर अंग टाकते.—

इतक्यांत केशिनी येते.

**केशिनी**—हं! चलावं! (दमयंती एखाद्या यंत्राप्रमाणे उठून चालूं लागते.)

**दमयंती**—(एक दोन पावलें गेली असेल नसेल तोंच, चालतां चालतां थबकून) मला, बाई, भीति वाटते!

**केशिनी**—कसली भीति?

**दमयंती**—ते आलेच नसतील तर?

**केशिनी**—असं कसं होईल, पण?

**दमयंती**—तुला वाटतं, ते येतील, आले असतीलसं?

**केशिनी**—म्हंजे??

**दमयंती**—लोकपालांनी येऊंच दिलं नाहीं तर?

**केशिनी**—इश्श, कांहीं तरी काय उगीच ! वीरसेनपुत्राला कोण अडवूं शकेल ?

**दमयंती**—( साशंक ) हं !

**केशिनी**—( हंसून ) अतिस्नेहः पापशंकी !! दुसरं काय ! चला !

**दमयंती**—बरं, चल ! होऊं दे एकदां साक्षमोक्ष काय तो. ( थोडे थांबून, दृढस्वराने, स्वतःशींच ) ते नसले तर मी तश्शी परतेन !

## ( १४ )

—स्वयंवरमंडपांत निरनिराळ्या देशांचे राजे आपापल्या आसनांवर विराजमान झालेले असतात. कुणी एकमेकांची प्रेमळ थट्टा करीत असतात, तर कुणी बोचक वाक्यांनी एकमेकांना प्रहार करीत असतात. साऱ्या मंडपभर एकच कोलाहल माजून गेलेला असतो. इतक्यांत सुस्वर वाद्यें वाजूं लागतात, आणि भीमराजाच्या सिंहासनाजवळच असलेल्या द्वारांतून, आपल्या सख्यांसह दमयंती मंडपांत येते. तिला पाहतांच साऱ्यांच्या गप्पा बंद होतात; सगळ्या राजांची नजर तिच्यावरच खिळून बसते. तिच्या सौंदर्याने दिपून गेल्यामुळें क्षणभर सारेच अनिमेष आणि निस्तब्ध होतात. दमयंती, आपल्या सख्यांसह, हातीं स्वयंवर-माला घेऊन, मंडपांत फिरूं लागते. लगेच जो तो राजा आपली वस्त्रें आणि भूषणें सांवरून ठाकठिकीने बसण्याचा प्रयत्न करतो.—

—मंडपांत आल्यापासून दमयंतीची नजर चारही दिशांना भिरिभिरी फिरत असते—फिरतां फिरतां **दमयंती** केशिनीला हळूच म्हणते—

" दिसतात कां ग, तुला, ते ? मला तर कांहींच दिसत नाहीं. मी अगदी गोंधळून गेलें आहे. "

**केशिनी**—घाबरूं नका, अशा. चला माझ्या बरोबर !

त्या चालूं लागतात; इतक्यांत एका खांबा आडून नल राजासारखा एक चेहरा केशिनीच्या नजरेस येतो. तिकडे डोळ्यांनीच निर्देश करीत **केशिनी** म्हणते :

" ते, बघा !! "

**दमयंती**—( तिकडे बघून, सानंद ) अय्या, खरंच !!

—दोघीही तिकडे वळतात—

—उद्दिष्ट जागेजवळ त्या जातात मात्र, तों तिथें एक ऐवजीं पांच, अगदीं एकसारखे, नल बसलेले त्यांच्या नजरेस येतात; आणि ते दृश्य पाहून दोघीचेहि चेहरे एकदम उतरतात.

**दमयंती**—( हळूंच ) केशी, घात झाला ग ! आतां ओळखूं तरी कशी !!

**केशिनी**—हें त्या लोकपालांचं कपट आहे !

**दमयंती**—( साश्चर्य ) लोकपालांचं ?

**केशिनी**—हं ! त्यांनीहि मुद्दाम नलराजासारखंच रूप आणि वेष धारण केला आहे.

**दमयंती**—पण, लोकपालांना ओळखायचं कसं ?

**केशिनी**—देव आणि माणसं यांतल्या फरकाने !

**दमयंती**—( सर्वांकडे निरखून पहात ) पण इथं तर सर्वांच्याच वस्त्रांवर थोडीफार धूळ आहे; डोळे कोणाचेच अनिमेष नाहींत.

**केशिनी**—हं ! आणि साऱ्यांच्याच मालांचीं फुलं थोडथोडीं कोमेजूं लागलीं आहेत.

**दमयंती**—छाया साऱ्यांनाच आहेत.

**केशिनी**—अन्, आसनांना भूमीचा आधारही आहे.

**दमयंती**—( धीर सुटून ) आतां कसं करूं ? कसं होईल माझं ?

**केशिनी**—( दुःखद स्वराने ) खरंच !...आतां काय करावं !

**दमयंती**—थांब ! मनांतल्यामनांत मीच त्या देवांना शरण जाते; म्हणजे माझी दया येऊन ते आपलं खरं रूप दाखवितील ! ( डोळे मिटून; हात जोडून )

राजहंसाच्या भाषणापासून नलराजाला मी खरोखरच आपला पति मानला असेल, तर देवांनी दयाळूपणाने मला त्याचं दान करावं. नलाशिवाय कायावाचामनानेही इतर कुणाविषयीं मी मनांत विचारही आणला नसेल तर देवांनीं स्व-रूप धारण करून माझा पति मला दाखवून द्यावा. मनापासून, खरोखरच, केवळ नलाच्या प्राप्तीसाठी मी हें स्वयंवर आरंभलं असेल तर मला त्याची भीक घालून माझा संकल्प तडीस न्यावा. दैवानेच निषधाधिपाची आणि माझी सांगड घातली असेल तर देवांनी ती गांठ अधिकच पक्की करावी. आपल्या या कन्येचे लाड देवांनो, आपणच पुरवावेत. प्राणांच्याही मोलानं मागितलेली ही भीक देवांनो आपणच मला घालावी."

—दमयंतीच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागतात. आपले मिटलेले डोळे न उघडतांच ती देवांना नमन करते; व मग डोळे उघडते तों तिला. शरीरास घाम नसलेले, दृष्टि अनिमेष असलेले, प्रफुल्ल पुष्पमाला घातलेले शरीरास अगर वस्त्रा-सही धुळीचा स्पर्शही नसलेले, आणि छाया नसलेले, व भूमीला स्पर्श न करतां उभे राहिलेले देव दिसले; आणि अगदीं त्यांच्या विरूद्ध, म्हणजे छायायुक्त, गळ्यांतली पुष्पमाला सुकूं लागलेला, धर्म व धूलिस्पर्श यांनी युक्त, व भूमीस स्पर्श करून उभा असलेला, आणि ज्याच्या डोळ्यांची उघड झांप होते आहे असा नल-राजा दिसला : वेगळा, स्पष्ट असा, ओळखतां आला.—

दमयंतीने पुनः देवांस सादर, सानंद, नमस्कार केला, आणि पुढें होऊन सस्मित मुखाने नलराजाच्या गळ्यांत माळ घातली. दोघांनीही एकमेकांकडे साश्रु नयनांनी, सादर, सप्रेम बघितलें. नलराजानं दमयंतीचा उजवा हात आपल्या हातीं घेतला. लज्जेने दमयंतीचें मुख अवनत झालें.—

—वाद्यांचा एकच गजर झाला. जयघोषाने मंडप हादरून गेला.—

# दमयंती

## ( १ )

### कुंडिनपुरांतील भीमराजाच्या प्रसादाचा एक सौध ( गच्ची ).

सर्यास्तानंतरच्या सुवर्णरंगी संधिप्रकाशाने सारी दुनिया नुसती भरून गेली आहे. त्या पिवळट तांबूस रंगाने मूळच्या शुभ्र अशा त्या प्रासादाच्या धवल सौधालाही केतकीवर्ण प्राप्त झालेला आहे. दूरवर दिसणाऱ्या पदार्थांना आणि वस्तूंना धूसरवर्ण प्राप्त झालेला आहे. फार दुरून नगराकडे येणारे मार्ग तर धुळीने व्याप्त झालेले दिसत आहेत; आणि त्यामुळे दूरत्वामुळे आधींच लहान आणि एखाद्या काळ्या ठिपक्याप्रमाणे दिसणाऱ्या मार्गस्थाच्या आणि प्रवाशांच्या तांड्याच्या आकृति धुरकट आणि अस्पष्ट दिसत आहेत. खालीं नगरामध्यें जरी क्वचित् क्वचित् कोठें दिवे लागले जात आहेत तरी देवाघरची दिवेलावणीची वेळ मात्र अजून फारशी नजीक आलेली दिसत नाहीं; कारण एखाद्या युवतीच्या आरक्त गालांशेजारीच चाफेकळीसारख्या सुंदर नाकांत हिऱ्याची चमकी जशी शोभावी तशीच एकच एक तारका पश्चिम दिशेला दिव्य तेजानें झळकत आहे. संध्याकाल झाल्यामुळे संध्येची वेळ सांगणारे नगारे आणि निरनिराळ्या देवळांतील मंजुळ पण भिन्नभिन्न असें घंटानाद ऐकूं येत आहेत. नगरीचीं प्रवेशद्वारें बंद होण्याच्या वेळेच्या, वेशीवरील पहारेकऱ्यांच्या ललकाऱ्या वाऱ्याच्या झुळकेबरोबर दूरून कुठून तरी कर्णपटलांवर आदळत आहेत. अशा वेळीं भीमराजाच्या प्रासादाच्या सौधावर दमयंती आणि तिच्या सख्या सौधाच्या कठड्यावर रेलून वांकून दूरवर नजर टाकतांना दिसत आहेत. अधूनमधून नगरेचा

टप्पा वाढावा म्हणून त्या मिवयांशी हात नेऊन नेत्र किलकिले करून पहात आहेत. त्यांची ही कृति-जमिनीवरून पहाणागला, सुवर्णाचें शरीर असून श्याम पंख असणाऱ्या गुचगुचीत पक्ष्यांच्या हालचालीसारखी दिसत आहे. इतर सख्याची जरी असली अस्वस्थता निदर्शक हालचाल एकसारखी चालली असली तरी दमयंती मात्र एखाद्या पुतळीप्रमाणें स्थिर आहे. सौधाच्या कठड्याला लागून असलेल्या एका शिलासनावर थोडीशी उकिडवी अशी दमयंती बसली आहे. तिनें आपलें उत्तरांग सौधाच्या भिंतीकडे थोडेसें कलतें केलें आहे, व आपलें उजवें कोपर सौधाच्या कठड्याच्या भिंतीवर टेकलें असून त्यावर आपली हनुवटी स्थिर केली आहे. तिनें आपले केस मोकळे सोडलेले असून ती अलंकार विरहित आहे. तिचे आधीच विशाल असलेले डोळे दूरवर, शांतपणें, चौकसपणें व एकसारखें पहात असल्या-मुळें फारच विशाल व पाणीदार दिसत आहेत; आणि त्यांतही संधि-प्रकाशांचा परिणाम झाल्यामुळेंच उदासतेची छटा त्यांत आली असली तरी कांही एक औरच तेज त्यांना प्राप्त झालेले आहे. डोळ्यांच्या खालची काळसर कडा, एकाच दिशेला दूरवर व स्थिरतेनें दृष्टि टाकली गेल्यामुळें किंचित् ओलसर होऊन, प्रकाशयुक्त झालेली आहे, तसेंच कपाळाच्या टोंकाला भिंवयाच्या जवळही घर्मबिंदू असून तेही थोडेसे प्रकाशमान झाले आहेत. दमयंती आपल्याच काळजींत व विचारांत इतकी मग्न आहे की तिला आपल्या पदराचेंही भान नाहीं. दमयंतीच्या जवळच तिची प्रियदासी केशिनी हाती पंखा घेऊन उभी आहे, ती मधेंच दमयंतीला पंख्यानें वारा घालते, मधेंच दूरवर नजर टाकून नगराकडे येणारा रस्ता न्याहाळते, आणि मध्येंच दमयंतीकडे एकसारखी टक लावून दयार्द्र दृष्टीनें, आणि आपलेपणाच्या पोटी जन्म घेणाऱ्या सहानुभूतीनें पाहते.

अशा प्रकारें क्षण दोन क्षण गेले असता दमयंती एक दीर्घ निःश्वास टाकते व निराशेमुळें ती थोडीशी मन खचल्याप्रमाणें करिते. तिच्या त्या दीर्घ नेत्रांत पाणी उभें राहतें, तरी तें न पुसतां, किंवा केशिनीकडे न वळतां ती केशिनीला सगद्गद् स्वरानें विचारते:

" केशी तुला दिसतंय् कां ग कांही समोरच्या रस्त्यावर. माझे मेले डोळे कसे फुटलेत अगदी ! "

केशिनीचें मनही दुःखानें तितकेंच भागवलेले असतें परंतु दमयंतीला हंसविण्याचा एक छोटासा प्रयत्न म्हणून ती लाडिकपणानें, थट्टेनें व व्यंजक स्वरा म्हणते.

" देवी वादळ होणार असलं आणि गंगायमुनांचा पूर लोटणार असला म्हणजे असं कांहीसं होतं म्हणतात तुम्हांला नाही असं वाटत ? "

केशीच्या कोटीनें दमयंतीचा भार हलका होण्याऐवजी तिचें दुःख हृदय फोडून बाहेर पडतें; तिच्या डोळ्यांना टच्कन् पाणी येतें, व एकदोन अमोलिक अश्रूबिंदू तिच्या गालांवरून ओघळून उरोभागावर पडतात. ती केशिनीकडे मुख वळवून भरल्या आवाजानें म्हणतेः

" केशी असली कसली ग तुझी जीवघेऊ थट्टा, अशा भलत्या वेळी दिखील सुचावीना तुला थट्टा ! "

दमयंतीचा दुःखावेग इतका अनावर होतो की ती एकदम दोन्ही हातांनी आपले मुख झांकून घेते व हुंदके देऊन रडूं लागते.

हें दृश्य पाहून केशीला मात्र आपण कुठून बोललों असें होऊन जातें व तिचा चेहरा उतरून सहृदयतेमुळें तिच्याही डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागतात. सौधाच्या कठड्यावर चट्कन अलगद्पणें हातचा पंखा ठेऊन केशिनी दमयंती-शेजारीं शिलातलावर बसते व दमयंतीचें मुख आपल्याकडे वळवून तिच्या दोन्ही खांद्यावर हात ठेऊन दीनस्वरानें म्हणते.

" देवी तुम्हांला दुखवावं असं नव्हतं हो माझ्या मनांत. पण मी तरी काय करूं ! तुम्ही आपलं एकसारखं नलदेवांच्या वाटेकडे डोळे लावून अश्रू गाळीत बसतां; तुमचं तरी मन कसं हो रमवावं आम्हीं ! तुमच्या मनाला विरंगुळा वाटावा म्हणून कांही बोलावं, तें मेलं नेहमीं असतं होतं. अन् देवानं अक्कलही मेली दिली नाही आम्हांला." असें म्हणून ती दमयंतीचे हात आपल्या हातांत घेते व विन-

चणीच्या स्वरानें म्हणते. "काढा काढा, बरं देवि आपले हात, नाहीतर फुटेल माझ हृदय" असें म्हणून केशिनी दमयंतीचे हात सोडून देते व आपणही हुंदके देऊन रडूं लागते.

आतां दमयंती आपलें रडें थांबवून केशिनीचें सांत्वन करूं लागते. "उगी उगी केशी माझ्या मेल्या अभागिनीसाठी तूं कशाला रडतेस. सारी चूक माझ्या कर्माची. जन्मतांच मेलें असतें म्हणजे कुणालाच त्रास झाला नसता माझ्यामुळें."

केशिनी चटकन् रडें थांबवुन म्हणते. "नका असं अभद्र बोलूं देवी." असें म्हणून आपल्या हाताच्या बोटांनी ती दमयंतीचें मुख झांकते.

केशिनीचा हात मुखावरून काढून प्रेमानें आपल्या हातीं घेत दमयंती म्हणते- "बोलूं नको तर काय करूं केशी. नको झालाय माझा जीव मला. किती ग दिवस माणसानं आशा तरी धरायची ! इतक्या ब्राम्हणांना शोधासाठीं पाठवलं तरी अजून कसा ग कुणालाच मेल्याला त्यांचा पत्ता नाही. अन् आज तर सूर्यास्त होऊन गेला तरी कशाचीच खबर नाही......"

दमयंतीचें हें वाक्य संपते न संपतें तोंच जिन्याच्या बाजूनें दोन बालकांचे मंजुल आणि उत्सुक स्वर एकदम ऐकूं येतात. "माईग ए माई ऽ ऽ !"

दमयंतीचा सारा शोक नाहीसा होऊन त्या ठिकाणी वत्सलतेचें साम्राज्य पसरते, व ती हर्षभरित व प्रेमळ स्वरानें विचारते. "कायरे, कायरे बाळ ?" दमयंतीचें हें वाक्य संपते न संपते तोच जिन्यांत रागाचे शब्द ऐकूं येतात "इंदू इंदे, मी सांगणार आईला"..."नाहीं नाही मी सांगणार जा, हें रे काय सेन !" व त्यानंतर समजावणीचा एका दासीचा स्वर ऐकूं येतो. 'असं भांडु नाइ सरकार मी सांगू कां मग !' आणि यानंतर 'तूं नको. तूं नको. मीच सांगेन आईला' असें घाईघाईनें उच्चारलेले दोन स्वर ऐकूं येतात व दुसऱ्याच क्षणीं सौधावर एक दासी, एक सात आठ वर्षांचा मुलगा व त्याच्याच सारखी परंतु दोन अडीच वर्षांनी लहान अशी एक मुलगी असें त्रिकूट येतें. तीं दोन्हीं बालकें धांवत धांवतच आपल्या आईच्या अंगावर चढतात व दोघेंही "आईग खाली किनी एक दूत

आला आहे" असें एकदमच आईला सांगूं लागतात. त्यांच्या त्या गलबल्यापासून आईला निरोपाचा कांहींच पत्ता लागत नाही, पण त्यांचा तो अदम्य उत्साह व निष्पाप आनंद पाहून तिला अपत्यप्रेमाचें भरतें येतें, तिच्या मुखावर मूर्तिमंत समाधान विलसूं लागतें. आणि त्यांच्या संगतीनें मिळणाऱ्या समाधानाचें आणि सौन्दर्याचें तिला इतकें वेड लागतें की ती एकसारखे त्यांचे पटापट मुके घेण्यांतच दंग होते. कोणाच्याही हृदयाचा ठाव घेणारें हें दृश्य पाहून दमयंतीच्या दासी-गणाच्या आनंदाला तर पारावारच उरत नाही, त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंची पाझर होते. निरोप आणणाऱ्या पुष्पा दासीच्या पोटांत निरोप मावेनासा झाल्यामुळें ती सर्वांआधी शुद्धीवर येते व नम्रतेनें दमयंतीस म्हणते. "देवि खालीं एक ब्राम्हण दूत आला आहे. तेव्हां महादेवी आपणांस खालीं बोलावीत आहेत." हें वाक्य ऐकल्याबरोबर दमयंती एकदम शुद्धीवर येते व **इंद्रसेनेस** कडेवर घेऊन जिन्यांतून खालीं जाऊं लागते.

## ( २ )

## दूतांस भेट देण्याचें एक दालन

यांत मध्यभागी एक उंच **शिलासन** असून त्यावर गाद्यागिर्द्यांची उत्तम सोय केलेली असते. त्यावर एक पाय खालीं सोडून महादेवी म्हणजे दमयंतीची आई बसलेली असते. ती पोक्तवयाची असून तिच्या चेहऱ्यावरचा भाव प्रेमलतेचा असूनही त्यावर धीरतेचें गांभीर्याचें आणि शांततेचें आणि रुबाबाचें असें कांही दिव्य तेज पसरलेलें असतें की ती खरोखरच राजमाता असावी असें कोणीही म्हटलें असतें; तिला पाहिल्यावर सहाजिकच मन विनम्र व्हावे व नकळत नमस्कार घातला जावा असें तिचें एकंदर स्वरूप होतें.

महादेवींच्या उजव्या डाव्या हातांस मोठमोठ्या समया तेवत असतात. व तिच्या समोरच पांच सहा हातांच्या अंतरावर एक लांबच्या प्रवासानें श्रांत दिसणारा ब्राह्मण हात जोडून उभा असतो. त्याला महादेवी आपलेपणानें ( घरोब्यानें ) विचारतात.

" काय **उत्तंका** केव्हां आलास. "

**उत्तंक** (सविनय उत्तरतो.) " हा आत्तांच येतोय् महादेवि. राजदूत म्हणूनच वेशींतून आंत येऊं शकलों " असें म्हणून तो पावलें वाजल्यामुळें मागें पहातो. त्याच्या मागें असलेल्या दालनाच्या एकाच दारांतून इंद्रसेनेस कडेवर घेऊन येणारी दमयंती त्यास दिसते, महादेवींचेंही लक्ष्य तिच्याकडे जातें. दमयंतीस पाहून उत्तंक तिला सादर प्रणाम करीत उद्गारतोः—" शतशः प्रणाम देवी. " दमयंती किंचित् स्मित करून मानेनेंच त्याचा प्रणाम स्वीकारल्याचें दर्शविते, व उत्सुकतेनें महादेवीजवळ येऊन उभी रहाते; तिला महादेवी म्हणतातः

" ये **भीमे** ये, बैस अशी इथं. " दमयंती बसल्यावर इंद्रसेनेस म्हणतात— " ये बाळ इंदू. येतेस कां माझ्याजवळ ? " इंद्रसेना आईस अधिकच चिकटते; तेव्हां लटकाच राग आणून महादेवी म्हणतातः " बरं ! बरं !! नको तर जा. इंद्र-सेन तूंच येरे माझ्याजवळ. " इतका वेळ दारातच केशिनीनें धरून ठेवलेला इंद्रसेन धांवतच येऊन आजीच्या मांडीवर बसतो. महादेवी त्याला पोटाशी धरून त्याचें मुके घेत घेत म्हणतातः " माजा बाळ तो. कित्ती कित्ति शाना आहे माझा बाळ. " यावेळी इंद्रसेनेचा चेहरा पहाण्यासारखा असतो. राग व रडूं येऊन ती आपलें मुख दमयंतीच्या पदरांत लपविते. महादेवी आणि दमयंती एकमेकींकडे पाहून स्मित करतात. दोन्ही देव्यांच्या मागें उभ्या झालेल्या दासीही कौतुकमिश्रित स्मित करितात. महादेवी स्मितमुखानेंच उत्तंकास प्रश्न करितातः

" उत्तंका दक्षिण व पश्चिम दिशांस पाठविलेल्या दूतांपैकी तूंच काय तो उरला आहेस. तेव्हा तुझ्या यत्नांचें काय झालें हे थोडक्यात पण स्पष्टपणें सांग. दमयंतीच्या कूट प्रश्नांस उत्तर मिळाले काय ! "

महादेवीचा प्रश्न ऐकतांच उत्तंकाच्या मुखावर लज्जेचा भाव दिग्दर्शित होतो, व त्याची मान खालो कळते. तो भग्न हृदयानें व दुःखित स्वरानें उत्तरतो.

" महादेवि, मला क्षमा असावी माझ्यासारखा अभागी मीच " त्याच्या डोळ्यांतून खरोखरच अश्रु गळूं लागतात. तो पुढें म्हणतोः " माझं हें अपयशी काळें

तोंड आपल्याला दाखवायची खरोखरच माझी इच्छा नव्हती. पण आपली आज्ञाच तशी होती म्हणून मी परत आलों या करंट्याला आपण लवकर निरोप द्यावा "

हें ऐकतांच दमयंतचा चेहरा पार उतरून जातो, व ती एखाद्या भीत हरिणी-सारखी दिसूं लागते. ती आपल्या डोळ्यास पदर लाविते. महादेवीचा ही चेहरा उतरला असला तरी त्या स्वतःला सांवरून उत्तंकाची समजूत घालतातः–

" उत्तंका तूं वाईट वाटून घेऊं नकोस. प्रयत्नच फक्त आपल्या हातचा असतो. यशापयशाची बाब ईश्वराच्या मर्जीवर अवलंबून असते. "

**उत्तंक**—" महादेवि, तें खरं असलं तरी आपली अथवा देवीची ( दमयंतीकडे वळून ) योग्य सेवा न घडल्यानं हृदयाला घरं पडतात."

**महादेवीः**—" तूं इतक्या दूर शोध घेऊन आलास ही काय थोडी सेवा झाली ? (स्वतःच्या मागें उभी असलेल्या पुष्पा दासीस उद्देशून) पुष्पे, उत्तंकाचा रोजमुरा त्यास धनपतीकडून मिळवून दे. ( उत्तंकाकडे वळून ) आणि उत्तंका आज भोजन वाड्यांतच होऊं दे हां."

**उत्तंकः**—' जशी आज्ञा महादेवि ' असें म्हणून महादेवीस व दमयंतीस प्रणाम करीत मागल्यापावली परत जातो; व त्याच्या मागोमाग पुष्पाही जाते.

इकडे दमयंती निराश होऊन भग्नहृदयानें जमिनीकडे दृष्टी लावून अश्रु-गाळीत बसलेली असते, तिची महादेवी समजूत घालूं लागतात. ' भीमे असं रडून कसं चरं चालेल ? उगी माझी बाळ ती ! ' असें म्हणून महादेवी तिला पोटाशी घेतात तों दमयंतीला दुःखाचा ज्यास्तच उमाळा येऊन ती हुंदके देऊं लागते, व आपले तोंड झांकून घेते. मध्येंच एकदम चेहऱ्यावरील हात काढून भकास चेहऱ्यानें ती अर्धवट स्वतःशीच म्हणतेः माझंच नशीब खोटं, मी दुसऱ्याला कशाला दोष लावूं. "

आतां मात्र दमयंतीस आपलें रडें अगदी अनावर होतें व ती आईच्या कुशींत तोंड झांकून हमसाहुमशी रडूं लागते.

# ( ३ )

## अयोध्या नगरीः—

बाहुकाच्या झोंपडीवजा घरासमोरच एक लहानसें आंगण असून त्यांत एका खाटेवर एक गुंडाळलेली वळकटी आहे. त्या वळकटीला टेंकून आणि लांब पाय पसरून बाहुक पडलेला आहे. वेळ, रात्रीं, घटका दीडघटकेची असून अंधुक अंधुक असें अति मधुर चांदणें पडलें आहे. आजचं हें चांदणं साधंसुधं नाहीं; त्यात मदिरेची मादकता आहे, त्यांत स्वप्नसृष्टीची अस्फुटता आहे, त्यांत विरहाची हुरहुर आहे, त्यांत प्रीतीची आतुरता आहे. सुख दिखिल खुपतं म्हणतात तें बहुधा अशा चांदण्याकडे पाहूनच म्हटलं असावं. कारण आजचं चांदणं गोड आहे आणि तरीही तें वेड लावणारं आहे; आणि आजच्या चांदण्याकडे पाहून मनांत एक अपूर्व आनंद संचरत असला तरी त्यामागोमाग एका अननुभूत, अगम्य हुरहुरीचा दुःसह निःश्वासही नकळत बाहेर पडतो आहे. सुखासीनांनाही वेड लावणाऱ्या या चांदण्यानं बाहुकाच्या मनांत उदास भावनाविचारांचं वादळ उठवलं असेल आणि त्यांचं प्रतिबिंब जर त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत असेल तर त्यांत बाहुकाचा काय बरं दोष!

बाहुकानें आपले हात डोक्यामागें एकमेकांत अडकविले असून तो दीन दृष्टीनें समोर दिसणाऱ्या चंद्रिकेकडे पहात आहे; त्यानें आपले पायही एकमेकांत अडकविलेले आहेत.

बाहुकाच्या मागें त्याच्या घराच्या पांढऱ्या भिंतीवर झाडांच्या सावल्या पडल्या असून त्या मंदमंद वहाणाऱ्या झुळकेनें सर्वच अगदीं अस्पष्टपणें हालल्याचा भास होत आहे. बाहुकाच्या घराच्या मागें, कांहीं अंतरावर उंचच उंच अशा राजप्रासादाच्या कांहीं भिंती दिसत आहेत. आणि त्या भिंतींच्याही वर कांहीं तारका मंद तेजानें चमकत आहेत.

आकाशाकडे पहातां पहातां बाहुक एक दीर्घ निःश्वास टाकतो; व स्वतःशीच पण मोठ्यानें आणि भरल्या गळ्यानें पुढील अर्थाचें एक कडवें म्हणतो:

"हाय! तहान भूक आणि श्रम यांनी तिला किती छळली असेल. माझ्या आठवणीनें तुझी झोंपही उडाली असेल.

माझ्या मूर्खपणामुळं किती संकटांनीं तुला नाडलं असेल. कुठं, कुणाकडं असशील तूं! काय अवस्था झाली असेल तुझी!"

बाहुक हें कडवं इतक्या एकाग्रतेनें म्हणत असतो की बाह्य जगाकडे त्याचं लक्षही नसतं. कडवं संपतं तरी त्याची चंद्राकडे लागलेली दृष्टि खाली वळत नाही. त्याच्या गालांवरून अश्रूंचे ओघळ वहात असतात तरी त्याला त्यांची दादच नसते.

बाहुकाचें कडवे संपते न संपतें तोंच 'नमस्ते अश्वाध्यक्ष' असा आवाज ऐकूं येतो. आणि बाहुक आपल्या तंद्रीतून जागा होतो. समोरच उभ्या असलेल्या जीवलाकडे पाहून तो किंचित् ओशाळल्यासारखा होतो, व जीवलाकडे सस्मित पण ओशाळल्या नजरेनें पहात, व दिलगिरीच्या स्वरांत म्हणतो—

"ओ हो! कोण जीवल! नमस्ते! या, केव्हां आलांत तुम्ही! कळलंच नाही मला कांहीं."

जीवल बाजेवरच पण जरा खालच्या बाजूला बसत म्हणतो—"भले महाराज! केव्हांचा आलोंय मी. पण आपलं लक्ष असेल तर ना!

**बाहुकः**—खरंच!

**जीवलः**—खरं म्हंजे! (जरा थांबून) पण कांहो बाहुक किती तरी दिवस एक गोष्ट विचारीन विचारीन म्हणतोय तुम्हांला, विचारूं का? हरकत नसेल तर विचारतों."

बाहुक न विचारण्यासारखें कांहीच नाही असा बहाणा करीत म्हणतो: हो, हो! विचारा कीं!

**जीवलः**—बाहुका, तुमच्या गायनांत शास्त्र नसेल कदाचित्, पण हृदय आहे खास. कितीकदां तरी तुमच्या या करुण गीतानं माझे डोळे अश्रूंनी डबडबले असतील; आणि दिवसभर समाधानीवृत्तीनें कामकरणाऱ्या बाहुकाच्या हृदयाला याच वेळीं दुःखाची भरती कां यावी, हें कोडें माझ्या मनाला पडलं असेल...

**बाहुकः**—जीवल, सुखासुखी कोण दुःखाला मिठी मारतो! प्रत्येकाच्या आयुष्यांत असे कांहीं तरी प्रसंग असतातच ना, कीं ज्यांचं विस्मरण फक्त मृत्यु-नेंच होणं शक्य असतं ?

**जीवलः**—खरं आहे बाहुका! पण अशी कोणती गोष्ट घडली असेल कीं जिनें तुमच्या मनाला अशी अहर्निश टोंचणी लागावी ? बाहुका कोणा भाग्यवती स्त्रीसाठीं तुमचं हृदय असं तिळ तिळ तुटतं आहे ?

**बाहुकः**—मी सांगेन तेवढ्यावरच तृप्त रहायचं असेल, आणि प्रश्नांच्या मालिकेनं मला भंडावून सोडायचं नसेल तरच मी सांगतो.

**जीवलः**—आपल्याला योग्य दिसेल तेंच आपण करावं. भलत्याच प्रश्नांनी आपल्या हृदयाला घरं पाडायचा निर्दयपणा मात्र माझ्या हातून कधीच होणार नाही.

**बाहुकः**—( जीवलाकडे पहाण्याचें धैर्य नसल्यामुळें खालीं पहात बाहुक बोलूं लागतो : ) एका महान् पतिव्रतेची एका मूर्खाशी जन्माची गांठ बांधली जाते. त्याच्या मूर्खपणामुळें खडतर वनवासाचा प्रसंग आला तरी त्याच्या सेवेंतच स्वर्ग मानून ती त्याचेबरोबरच अनेक कष्ट सोसते. पण हा मूर्ख मनुष्य मात्र एका भयंकर अरण्यांत तिला एकटीच टाकून चालता होतो. आणि नंतर मात्र; "आता तिचें कसें होईल," अशा विचारानें शोक करीत बसतो. आपल्या माणसांची किंमत ती गमावल्यावरच आपल्याला कळते हेंच खरं. अशा एका गोष्टीवर तें गीत बसवलं आहे. आणि माझं म्हणाल तर ( स्वतःशीच विषण्णतेनं हंसत बाहुक म्हणतो ) समानशीलत्वामुळेंच त्या मूर्खाचं गाणं म्हणावसं मला वाटतं."

भाषण संपल्यावर बाहुक जीवलाकडे पहात अति विषण्णतेनें स्मित करतो. जीवलाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिलेले असतात पण आला प्रसंग साजरा करायचा म्हणून तोही बाहुकाकडे पाहून किंचित् स्मित करितो.

## ( ४ )

## भीमराजाच्या राजवाड्याच्या तटांतील एक शिवालय

बाहेर सूर्योदयाची वेळ असल्यामुळें चारी दिशांना जरी उल्हासच उल्हास असला, पक्षिगण आपल्या किलबिलाटानें सूर्योदयाबद्दल भूपाळ्या गात असला, तरी शिवालयाच्या गाभाऱ्यांत मात्र, शांत गंभीर वातावरण पसरलेलें असतें. शिवाच्या पिंडीवर पूजेची फुलें आणि बेलपत्री विखुरलेली असते; आणि पिंडीवरच असणाऱ्या सुवर्णाच्या अभिषेक पात्रातून पिंडीवर अविरत अभिषेक होत असतो. शिवाच्या पिंडीच्या बाजूला दोन मोठाल्या सोन्याच्या समया व पिंडीच्या जरा मागें एक लामणदिवा शांत निस्तब्धपणें तेवत असतो. पिंडीच्यासमोर हात सवाहात अंतरावर दमयंती हात जोडून व विनीत मुखानें उभी असते. तिच्या मुखावर भक्ति आणि गांभीर्य उत्कटतेनं दिसत असलं तरी तिच्या हृदयाला अहर्निश जाळणाऱ्या शोकाची छटा अधून मधून या दोन भावनांच्या पडद्याआडून डोकावून गेल्याशिवाय रहात नाही. तिचे ओठ हळू हळू हलत असतात, आणि मधूनच मिटलेल्या डोळ्यां-तून झरणारी अश्रूंची मौक्तिकमाला, आणि आंवढा गिळण्यासाठी होणारे कष्ट, यांवरून दमयंतीच्या मनोनभांत होणाऱ्या भावनांच्या भयंकर वादळाची कल्पना येते. दमयंतीच्या मागें डाव्या हाताला उभ्या असणाऱ्या केशिनीचें नेत्र तिच्या मुखावर खिळलेले असतात व केशिनीच्या मुखावर दमयंतीच्या भावना हुबेहुब प्रतिबिंबित होतात. दमयंती स्वतःशीच पण थोडी मोठ्यानें बोलूं लागते.

"देवाधिदेवा, आमच्या सेवेंत काय बरं चुकलं ? आम्ही तुझी लेंकरं, आम्हांला क्षमा कर. तुझ्या मायेची पाखर आमच्यावर असूं दे. माऊली, आम्हांला असं दूर लोटूं नको. माझं पापिणीचं एक असो, पण माझ्या नाथांचा असा अंत पाहूं नकोस. ते कुठं गेले असतील, त्यांचं काय झालं असेल, त्याचं माथं किती भडकलं असेल, त्यांना जिणं नकोसं झालं असेल. देवा नको, नको आतां अंत पाहूं. नाही माझ्यानं सहन होत हें. अधिक ताणलंस तर तुटेल रे देवा ! त्यांची माझी नाही का भेट होणार ? त्यांचं तें प्रेमळ मुख दिसेल का मला कधी ! त्यांची

अमृतमय वाणी पडेल का माझ्या कानीं? देवा आतां किती धीर धरूं? भेटव मला एकदां; निदान वार्ता तरी कळूं दे.........

दमयंतीचे शद्व संपायला आणि गाभाऱ्याच्या उंबरठ्याजवळची घंटी वाजायला एकच गांठ पडते. घंटी पुन्हां दोनदां वाजते, व "शंभो ऽ! शंभो ऽ! हऽर! हऽऽर!" असा आवाज ऐकूं येतो.

दमयंतीची प्रार्थना संपलेलीच असल्यामुळें ती मागें वळून पहाते, व तिच्या तोंडुन एकदम 'अगबाई कोण **पर्णाद?**' असें शद्व बाहेर पडतात; आणि पर्णादाच्या चेहऱ्यावर 'होय, मीच तो देवि' असें म्हणतांना आनंदाची जी अनुपम प्रभा फांकलेली असते तिचें प्रतिबिंब दमयंतीच्याही चेहऱ्यावर तत्क्षणी उमटतें. ती तशाच प्रफुल्ल वदनानें बाहेर येते व केशिनीस म्हणते—'केशिनी, जा बरं, आईला म्हणावं पर्णाद ब्राम्हण बातमी घेऊन आला आहे. तूं हो पुढं लौकर, आलेंच मी.'

केशिनी "जशी आज्ञा" म्हणून घाईघाईनें प्रासादांत जाते व तिच्या मागोमाग दमयंतीही निघून जाते. इकडे पर्णाद, शिवाच्या पाया पडून, 'शंभोऽ, शंभोऽ' करीत असतो.

## ( ५ )

## पूर्वींचेच दूतांना भेटण्याचें दालन :

दमयंती आणि तिची आई उच्चासनावर बसलेल्या असून उत्सुकतेनें पर्णादाची वाट पहात आहेत; त्यांच्या मागें पुष्पा व केशिनी या दासी पंखे घेऊन उभ्या आहेत. इतक्यात पर्णाद दारांतून पुढें येतो व महादेवी व दमयंती यांस अनुक्रमें अभिवादन करतो; व हात जोडून उभा राहतो.

महादेवी सस्मित मुखानें विचारतात :

"पर्णादा, तुझें कुशल आहे ना?"

पर्णाद नम्रपणें उत्तरतोः 'आपल्या कृपेनें कुशल आहे महादेवी.

**महादेवी**:—हं ! मग काय हकीकत आहे तुझी ?

**पर्णाद**:—थोडक्यांत म्हणजे मी उत्तरेकडील देश हिंडलो, अनेक यात्रांमध्यें, अनेक चौरस्त्यांवर, अगणित बाजारपेठांत, आणि इतरही पुष्कळ ठिकाणीं (दमयंतीकडे वळून) देवींचा प्रश्न टाकला परंतु कुठेंही त्यास उत्तर मिळालें नाही. अखेरीस जवळ-जवळ निराशच होऊन भांगासुरि ऋतुपर्णाच्या अयोध्येस येऊन पोहोंचलों. ऋतुपर्णाच्या राजसभेंतही माझ्या प्रश्नास उत्तर मिळालें नाही; अन् त्यामुळें मात्र मला अगदी मेल्याहून मेल्यासारखं झालं......

दमयंती थोड्या त्रासिक आवाजानें म्हणते :

"हें बघ, तुझं चऱ्हाट बंद कर बरं अगोदर. काय सांगायचंय् तें चटकन् सांग, थोडक्यांत."

महादेवी दमयंतीकडे अशा तऱ्हेनें पहातात कीं दमयंतीनें अशा वेळी न बोलणेंच बरें असें जणूं त्यांना सांगावयाचें असते. दमयंतीहि गप्प बसते.

**पर्णाद**:—पण मी अपेशी ठरावं असं ईश्वराच्या मनांत नव्हतं. देवीच्या प्रश्नाला अगदी अनपेक्षित रीतीनें उत्तर मिळालं...

'काय ? उत्तर मिळालं ?' महादेवी आणि दमयंती दोघेही अति उत्सुकतेनें आणि आश्चर्यानें एकदमच विचारतात.

**पर्णाद**:—होय देवि. उत्तर मिळालं आणि तेंही इतक्या अकल्पितपणें कीं माझा माझ्या स्वतःवरच विश्वास बसेना.

**दमयंती**:—म्हणजे असं झालं तरी काय ?

**पर्णाद**:—देवि आपणच कल्पना करावी कीं अयोध्येच्या राजसभेंतही जेव्हां मला उत्तर मिळालं नाही तेव्हां माझी स्थिति काय झाली असेल. नाहीतरी पांच सहा महिने माझ्या पायांना आणि माझ्या या तोंडाला विश्रांती नव्हती...... मग अशा स्थितीत मी कां बरं जिकीरीस येऊं नये ? कुठून या भानगडीत पडलों असं मला झालं होतं त्या दिवशीं. राजसभेंतून परत गेल्यावर उद्विग्न मनानं

शरयूच्या घाटावर सायंसंध्येसाठीं मी गेलो. माझी संध्या नुकतीच आटोपली होती. शरयूच्या संथ विशाल पात्राकडे स्थिर, दृष्टीनें मी पहात होतों. त्यावेळी माझ्या समोरच असलेल्या डोहाचं पाणी इतकं स्थिर शांत होतं की आकाशांत प्रतिक्षणीं उमटणाऱ्या विविध छटांचं प्रतिबिंब हुबेहुब त्या जलाशयाच्या पृष्ठभागावर उमटत होतं. त्या गंभीर देखाव्यानं माझं चित्त अगदी वेधून टाकलं होतं. इतक्यांत 'नमस्ते भूदेव! नमस्ते गुरुजी!' असा गंभीर आवाज माझ्या कानी आला. केवढ्यानें दचकलों मी! खरंच त्या प्रसंगाचं अगदी हुबेहुब चित्र माझ्या डोळ्यापुढें यावेळी उभं राहतंय्....

## ( ६ )

## पर्णादाच्या डोळ्यांना दिसणारा प्रसंगः

"नमस्ते भूदेव! नमस्ते गुरुजी!" हे शब्द ऐकून तो घाटावरील बुरजाच्या अगदीं टोकाशीं मांडी घालून बसलेला ब्राम्हण इतका दचकतो की बुरजाचा काट घट्ट धरूनच त्याला आपला तोल सांभाळावा लागतो आणि तो विस्फारित नेत्रानी, घाबरलेल्या अस्फुट आवाजानें, व भीतीचा आंवढा गिळीत विचारतो:

'अं! काय!'

ब्राम्हणाची ही स्थिती पाहून तो नमस्कार करणारा गृहस्थ किंचित् स्मित करतो, पण लगेच थोडासा खजील होऊन विनम्रपणें विचारतो—"राजसभेला कूट प्रश्न विचारणारे आपणच काय?"

ब्राम्हण किंचित् शुद्धीवर येऊन विचारतो:

"होय! कां बरं?"

ब्राम्हणाशेजारीच थोड्या अंतरावर बसत तो गृहस्थ थोड्या आर्जवाच्या स्वरांत म्हणतो:

"नाहीं, मला वाटतं मी त्याचं उत्तर देऊं शकेन."

आतां मात्र ब्राम्हण पूर्णपणें शुद्धीवर येतो; पण त्याच्या आश्चर्याला, उत्सुक-तेला आणि आनंदाला पारावार उरत नाही. तो त्या गृहस्थाकडे पुनः पुनः टक लावून निरखून पहातो. ती त्याची ऐटबाज पगडी, पण कुरूपांतच गणना होईल असा काळा चेहरा; आणि तरीही सौंदर्याची वाण भरून काढणारा त्याच्या चेहऱ्या-वरचा रुबाब, आणि एखाद्या ऐश्वर्यवान् माणसालाही—एखाद्या राजालाही—लाज-विणारी त्याची जमिनीवर बसण्याची ढब, निष्पाप अन्तःकरणाची साक्ष देणारे आणि हृदयाचा ठाव घेणारे त्याचे डोळे, या गोष्टींमुळें त्या ब्राम्हणाचें मत एकंदरीनें त्या माणसाबद्दल पुष्कळच चांगलें होतें. तरी तो थोड्या आश्चर्याच्या स्वरानें विचारतो:

" काय, आपण उत्तर देणार म्हणतां ? कोण आपण ? काय करीत असतां तुम्ही ?

तो गृहस्थ शांतपणें उत्तरतो:—" मी ऋतुपर्ण राजाचा अश्वाध्यक्ष. मला बाहुक म्हणतात. राजसभेंत मी आपला कूट प्रश्न ऐकला परंतु तिथें उत्तर देणं प्रशस्त न वाटल्यामुळें मी गप्प राहिलों, आपण मला पुनः तो कूट प्रश्न ऐकविल्यास मी यथामति उत्तर देईन."

बाहुकाकडे निरखून पहात ब्राम्हण विचारतो:—

" म्हणजे तुम्ही माझा पाठलाग करीत होतां की काय इतका वेळ ?"

ब्राम्हणाचा प्रश्न ऐकून बाहुक थोडा दचकतो, पण लगेच स्वतःस सांवरून उत्तरतो:—" छेः ! छेः ! तसं कांहीं नाहीं. इथं तुम्ही दिसलांत मग म्हटलं, द्यावंच झालं उत्तर तुम्हाला."

ब्राम्हणही आपल्याला कांहीं संशय आला आहे असें दिसूं नये म्हणून म्हणतो :

" वा ! वा ! योग्यच आहे तें. आम्हांला तरी अशी माणसं कुठं भेटताहेत ? ऐका तर मग नीट लक्ष लावून."

बाहुक जरा स्वतःला सांवरून बसतो व म्हणतो ' हं ! चालूं द्या !'

ब्राम्हण बोलूं लागतो; तो जणूं बाहुकालाच उद्देशून बोलतो आहे असा त्याचा आविर्भाव असतो, व त्याची नजर बाहुकाच्या प्रत्येक हालचालीवर खिळलेली असते; आणि आपल्या प्रत्येक वाक्यागणिक बाहुकाच्या चेहऱ्यावर होणाऱ्या भावनांच्या छटांची ये जा जणूं तो तत्परतेनें न्याहाळीत असतो.:—

" मला एकटीला वनांत निजलेली टाकून, प्रिया, आपण कुठं गेलांत ! माझी निद्रा, आपण जाणतांना ! आपापलीकडे माझं तुझ्यावर प्रेम आहे असं म्हणतां म्हणतां, प्रिया, मला ठकवून आपल्याच्यानं जाववलं तरी कसं ! आपण माझं अर्धवस्त्र फाडून नेलंत, उरलेलं अर्धच मी अजून नेसून आहे. प्रिया, दुःखानं मी अहोरात्र जळते आहे. माझ्या अश्रूंना खळ नाही. नाथ, माझ्यावर आपण दया नाहीं का करणार ! "

ब्राम्हणाच्या तोंडचे शब्द ऐकतां ऐकतां बाहुकाचें नेत्र अश्रूंनीं भरून येतात, त्याची मान खालीं वळते; पहिला रुबाब जाऊन त्याची कंबरच जणूं खचूं लागते. दुःखाच्या आवेगानें तो वाकूं लागतो, व त्यामुळें त्याला एका हातानें जमिनीचा आधार घ्यावा लागतो. त्याचा चेहरा दीन होतो. समोरचा ब्राम्हण आपल्याकडे निरखून पहात आहे याचें त्याला भान रहात नाही. ब्राम्हण अधिकच आवेशानें आणि सार्द्र सकंप आवाजानें बोलूं लागतो. :—

" माझ्या प्रश्नाचं आपण जरूर उत्तर द्यावं. धर्मज्ञ असूनही आपण पतिधर्म कां पाळत नाही ? मला आपण वाऱ्यावर कशी सोडलीत ? माझं संरक्षण किंवा पोषण आपण कां करीत नाहीं ! आपण सूज्ञ, कुलीन आणि दयाळू अहांत; आणि असं असूनही माझ्याशींच कांहो असा निर्दयपणा केलांत ?......पण मी आपल्याला तरी कां दोष देऊं. माझंच कपाळ फुटकं हेंच खरं.''

आतां मात्र बाहुकाच्यानें अगदीच राहवत नाहीं. तो दोन्ही हातांनीं आपले तोंड झांकून घेऊन मोठ्यानें एक हुंदका देतो आपलें बोलणें परिणामकारक होत आहे हें पाहून तो ब्राम्हण अधिकच नेटानें बोलूं लागतो.

" दया हाच खरा धर्म हें आपणच मला शिकविलंत ! मग माझ्यावरच कां बरं आपण इतके निष्ठुर झालांत ? नाहीच कां आपण माझ्यावर दया करणार ! जगूं तरी कशी मी मग !......

ब्राम्हणाला मध्येंच अडवून बाहुक दीनतेनें म्हणतो :

"नको! नको ब्राम्हणा मला असा छळूंस! झालं नाहीं कां तुझं अजून?"...

ब्राम्हण थोडासा राग आल्याचा आव आणून म्हणतो : "वा:! खूप भेटलांत राव! अहो, प्रश्नच ऐकून घ्यायला तयार नाहो तुम्ही, अन् म्हणे उत्तर देणार!........."

**बाहुकः**—"म्हणजे? अजून राह्यलं आहे की काय कांहि!

**ब्राम्हणः**—"तसं राह्यल नाही म्हणा विशेष. हं! मग काय उत्तर आहे तुमचं?

बाहुक, स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न करीत उत्तरतोः—

"कुलीन स्त्रिया कोणत्याही संकटांनीं आपला धीर खचूं देत नाहींत. आत्म-हत्येपासून स्वतःला वांचवून त्या खरोखरच स्वर्गाचं साधन करून ठेवतात. अनिवार्य विरहामुळें त्या पतीवर रागावीत नाहीत, किंवा वैतागूनही जात नाहीत. पतिव्रता स्त्रिया पातिव्रत्याच्या कवचानें आपल्या प्राणांचं रक्षण करतात......"

इतका वेळपर्यंत बाहुकाचा आवाज थोडा कठोर असतो परंतु भाषणास थोडा खंड पडल्याबरोबर त्याचें हृदय भरून येतें, व तो सद्गदित कंठानें म्हणतो:

"सर्वस्वाला नागवला गेल्यामुळें तो दिङ्मूढ झाला. असल्या बेभान स्थितीत त्यानं तिचा त्याग केला; त्या वेड्यावर तिनें कृपाकरून रागावूं नये. मोठ्या आशेनें पक्षी धरावयास टाकलेलं एकच एक वस्त्र नाहीसं होण्याचा प्रसंग अजून तिच्या आठवणीतून गेला नसेल. संकटांनीं भांबावल्यामुळें त्याच्या हातून जर कांही अपराध घडला असेल तर तिनं त्याला क्षमा करावी. राज्यभ्रष्ट, तेजोहीन, संकट-ग्रस्त आणि क्षुधित अशा स्थितीत त्याच्या हातून नकळत घडलेली चूक तिनें क्षम्य मानावी. प्रीतीला अक्षम्य असं काय आहे?......"

हें बोलणं संपताक्षणीच बाहुक डोळें पुशीत पुशीत घाईनें उठतो व भराभर चालूं लागतो.

ब्राम्हण प्रश्नाचें उत्तर ऐकण्यांत दंग झाल्यामुळें प्रथम ही गोष्ट त्याचें लक्षांत येत नाही. परंतु मग तो एकदम दचकून उभा राहतो व बाहुकांस मोठ्यानें हांका मारूं लागतो :—

" बाहुक ! बाहुक ! अहो बाहुक !"

परंतु बाहुक अंधारांत गडप होतो.

## ( ७ )

## पुनः पूर्वीचेंच दालन.

दमयंती महादेवी आणि दासी आपापल्या पदरानें गालावर ओघळलेलें अश्रू पुशीत असतात. पर्णादही खांद्यावरील उपरण्यानें आपल्या गालांवरील अश्रू पुसतो व त्याच उपरण्यानें वारा घेऊं लागतो.

**दमयंती**—" पर्णादाला विचारते पण पर्णादा तूं त्याचा पाठलाग कां केला नाहीस ? "

**पर्णादः**—" त्याचा पाठलाग करायची मला विशेषशी गरज भासली नाही. कारण बाहुकानें स्वतःच मला सांगितलं होतं कीं तो ऋतुपर्णाचा सारथी आहे. त्याच्या विषयीं इतर माहिती काढायला एवढा पत्ता मला पुरे होता...... "

**दमयंतीः**—" पण पर्णादा तूं त्याला एवढ्यावरच सोडायला नको होतंस !"

**पर्णादः**—" देवि पण मी कुठला, कोण, हें मला लपवायचं होतं ना ? मी त्याची पाठ पुरविली असती तर त्याला माझा खास संशय येता. अन् मग त्याच्या प्रश्नांना उत्तरं देतां देतां माझी तारांबळ उडाली असती. आणि देवि, आपली सेवा माझ्याहातून बरोबर झाली नसती......"

**महादेवीः**—" पर्णादा, तुझं वागणं शहाणपणाचं होतं यांत संशय नाही... ...बरं पुढं काय केलंस तूं."

**पर्णादः**—" पुढें गुप्तपणें मी बाहुकाविषयीं माहिती मिळविली. ती अशी—बाहुक हा अश्वविद्येंत निष्णात आहे असं पाहून ऋतुपर्णानं त्याला आपल्या पदरी

ठेवलं, कारण ऋतुपर्णाला वायुगतीनें रथांतून प्रवास करण्याची फार आवड आहे. अर्थशास्त्र, शिल्पविद्या, कलाकौशल्य आणि पाकशास्त्र यांमध्येंही बाहुक प्रवीण आहे. तो मला तरी अगदीं कुरूप वाटला; शिवाय त्याचा एक हातही आंखुड आहे."

हें ऐकून दमयंतीच्या चेहऱ्यावर विषाद, चिंता आणि संशय यांच्या छटा एकामागून एक अशा येऊन जातात; आणि शेवटीं विषादाचाच जोर झाल्यामुळें ती एक सुस्कारा सोडते व दीनपणानें आपली मान खालीं घालते; त्यावेळीं तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहतात. त्यांकडे पाहून दुःखित स्वरानें पर्णाद पुढील हकीकत सांगूं लागतोः—

" बाहुकाच्या हाताखालीं वार्ष्णेय आणि जीवल असे दोन सारथी आहेत. "

**दमयंतीः**—काय वार्ष्णेय ऋतुपर्णाकडे आहे ! आमचा वार्ष्णेय तर नाही ना तो ! "

**पर्णादः**—" होय देवि आपलाच वार्ष्णेय तो, पण त्याच्याकडून मला इतकंच कळलं की वार्ष्णेयानंतर थोड्याच दिवसांनी बाहुकही तिथें आला. ऋतुपर्णाचा जुना सारथी जो जीवल त्याच्या तोंडून मात्र बाहुकाविषयींची एक विचित्र गोष्ट मी ऐकली......"

**दमयंतीः**—( उत्सुकतेनें विचारते ) " कसली गोष्ट ! "

**पर्णादः**—" रोज दिवसभराचं काम झालं, अन् संध्याकाळ झाली की बाहुक आपल्या घरासमोरच्या आंगणांत बाज घालून चिंतामग्न असा बसलेला जीवलाला दिसे; आणि दररोज तो एकाग्र चित्तानें बाहुकानें म्हटलेलं करुण गीत ऐकी. तें गीत असं. ( पान ५६ पहा. )

पर्णादानें म्हटलेलं तें गाणं ऐकून महादेवी आणि दमयंती या दोघीचेही कंठ दाटून येतात, आणि दमयंती महादेवीकडे वळून म्हणते.

" आई हें गीत ऐकून माझा तरी संशय साफ फिटला. आमच्या परिस्थितीशी किती तंतोतंत जुळंतय हें अनुभवाशिवाय असले बोल निघत नसतात..."

**महादेवीः**—अगऽ पण भीमे, अशी आशेच्या आहारी जाऊं नकोस. पर्णादाला काय सांगायचं आहे तें तर ऐकून घेशील की नाहीं सगळं ! हं पर्णादा, चालूं दे तुझं !..."

**पर्णादः**—" जीवलानं बाहुकाला एक दिवस विचारलं की तूं असा रोज संध्याकाळीं कुणासाठीं शोक करीत असतोस? बरेच आढेवेढे घेतल्यानंतर बाहुकानं जीवलाला पुढील आख्यायिका सांगितली.

" एका महान् पतिव्रतेची एका मूर्खाशीं जन्माची गाठ पडते. त्याच्या मूर्ख-पणामुळें खडतर वनवासाचा प्रसंग आला तरी त्याच्या सेवेंतच स्वर्ग मानून ती त्याच्याबरोबर अनेक कष्ट सोसते. पण हा मूर्ख मनुष्य मात्र एका भयंकर अरण्यांत तिला एकटीला टाकून चालता होतो. आणि नंतर मात्र, आतां तिचें कसें होईल अशा विचारानें शोक करीत बसतो. आपल्या माणसांची किंमत तीं गमावल्यावरच आपल्याला कळते हेंच खरं. "......

**दमयंतीः**—" आई, आतां तरी माझं म्हणणं पटलं का तुला ? "

**महादेवीः**—" भीमे या दर्शनी साम्यानं आपल्या मनाला भुरळ पडूं देऊं नकोस. या अफाट संसारांत सारखेसारखे दिसणारे असे कितीतरी प्रसंग प्रत्यही घडत असतात. या आख्यायिकेतला प्रसंग तुमचाच आहे असं आपण एकदम कसं बरं म्हणूं शकूं ? चारी बाजूंनीं विचार करूनच काय तें ठरवलं पाहिजे,...... ( पर्णादाकडे वळून ) पर्णादा, तुझ्या हुशारीचं तुझ्या गुणांचं योग्य चीज कसं कसं करावं हें मला कळेनासं झालं आहे ..."

**दमयंतीः**—( सद्‍गदित कंठानें ), पर्णादा तुझ्या उपकारांची फेड माझ्यानं जन्मोजन्मी तरी होणं शक्य आहे का ? आज तूं मला माझे पंचप्राण परत केलेस; त्याची मी कशी उतराई होऊं ? माझ्या या गळ्यांतल्या कंठ्यानंच तुझी संभावना करणं मला प्राप्त आहे. या निर्धन, निराधार, दीन स्त्रीवर तूं दया कर. फूल ना फुलाची पाकळी म्हणून या कंठ्याचा तूं स्वीकार कर. माझ्या प्रियतमाची मला प्राप्ती झाली तर तुझं घर मी सोन्यानं भरून टाकीन......"

**पर्णाद्**—" देवि, उपकारांची गोष्ट कशाला ? आपली सेवा घडणं हें मी माझं महद्भाग्य समजतों. आपली कृपा हेंच माझं धन......"

दमयंती आणि पर्णाद् बोलत असतात येवढ्या वेळांत महादेवी सुणेनें सुवर्णमुद्रिकांनी भरलेलें एक ताट आणवितात; आणि तें आल्यावर पर्णादाला उद्देशून म्हणतात.

"पर्णादा हें ताट तुझंचआहे; याचा तूं उदार मनानं स्वीकार कर; तुझ्या उपकारांची फेड आमच्यानं होणं शक्य नाहीं.. जा, आपल्या आईबापांची भेट घेऊन त्यांना सुखी कर; आणि तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसणाऱ्या तुझ्या सहचरीचं सांत्वन कर. तुझा संसार निर्विघ्न असो..."

( पर्णाद् जातो. )...

## ( ८ )

सकाळची वेळ असते. दमयंतीच्या दालनाच्या बाहेरच्या ओसरीत सूर्यप्रकाशाचा एक झोतच्या झोत आलेला दिसत असतो. दमयंती एका उच्चासनावर खाली पाय सोडून बसलेली असते. त्याच उच्चासनावर तिच्या बाजूलाच इंद्रसेना नुकतीच स्नान करून येऊन बसलेली असते; तिनें कपडे केलेले असले तरी तिचे केस अस्ताव्यस्त असतात, आणि ते नीटनेटके करण्यांत आणि आपल्याशीच गाणं गुणगुणण्यांत दमयंती दंग असते. इंद्रसेना तिच्या वयाला शोभेल अशाच मोकळेपणानें आपल्या आईकडे मधून मधून टक लाऊन पहात असते. कांहीं अंतरावर केशिनी पंखा घेऊन उभी असते; आणि तिच्या जवळच तिचा हात अगदी आपलेपणानें धरून इंद्रसेन उत्सुक मुद्रेनें उभा असतो. त्याचं स्नान व पोषाख वगैरे झालेला असल्यामुळें तो बाहेर खेळायला जाण्यासाठी जणूं अधीर झालेला असतो. त्याची नजर दमयंती आणि इंद्रसेनेवर खिळलेली असते, तरी तो मधूनच वर तोंड करून केशिनीकडे पाहतो व पुनः आपली नजर इंद्रसेनेवर स्थिर करतो.

इंद्रसेनेचे केस वळवून झाल्यावर दमयंती तिच्या कपाळी कुंकू लावते व नंतर तिला हातानीच थोडेसे दूर धरून तिचा चेहरा उजेडाकडे करते; आणि इंद्र-

सेनेच्या निष्पाप, मुग्ध सौंदर्याकडे तिचें वत्सल हृदय ओढलें जाऊन ती इंद्रसेनेला आपल्या हृदयाशीं घेऊन तिचे पटपट मुके घेते, आणि स्मितमुखानें इंद्रसेनेकडे पहाते. इंद्रसेना मोठ्यानें हसूं लागल्याबरोबर दमयंतीही हसूं लागते व इंद्रसेन–केशिनीही साथ करितात. पुनः दमयंती इंद्रसेनेचें मुकें घेते व तिला सोडून देऊन मुदित अंतःकरणानें म्हणते.

"जा हं बाळ! खेळा हं आतां माझ्या राजा!"

तिचें हें बोलणें संपतें न संपतें तोंच दारांत सुदेव उभा असलेला दिसतो. त्यानें अंगांत एक बाराबंडी घातलेली असते; त्याचं धोतर गुडघ्याच्या थोडं खालीं आलेलं असतं; त्याच्या खांद्यावर एक उपरणं असतं; डोक्यावर एक पगडी व कानांत एक भिकबाळी असते; कपाळाला उभं गंध शोभा देत असतं. अन् डोळ्यांवरून हा ब्राह्मण साधासुधा नव्हे हे सहज ओळखूं येण्यासारखं असतं; त्याची मुद्रा सज्जन असते; तो सस्मित मुखानें दारांत उभा असतो. सुदेवाकडे लक्ष जातांच दमयंती उच्चासनावरून उठून उभी राहते व अर्धवट थट्टेच्या आणि अर्धवट आर्जवाच्या स्वरांत: "यावं यावं महाराज..."

सुदेव थोडा जवळ आल्यावर:—"अगदीं बहिणीच्या इथं यायला देखिल बोलावणं लागतं ना?" असं ह्मणून दमयंती जवळच असणाऱ्या दुसऱ्या एका उच्चासनावर बसण्याची सुदेवाला खूण करते. बसतां बसतां सुदेव म्हणतो.

"तसं नव्हे देवि, पण माझ्याही मागं संसार आहे ना?" लटका राग दाखवून दमयंती ह्मणते:

"तेंही खरंच! आतां आमची कशाला आठवण होईल तुला." हें वाक्य दमयंती इतक्या ठसक्यानें बोलते कीं त्यांतली खुबी लक्षांत आल्यामुळें सुदेवाला खुदकन हसूं आल्याशिवाय रहात नाहीं, आणि आपल्याला तिनें पार हरविलें असें दाखवून तो तिला कोंपरापासून हात जोडतो व म्हणतो:—

"भले! बाईसाहेब आज अगदीं मला बोलूंच द्यायचं नाहीं असं ठरविलेलं दिसतं आहे आपण!"

लगेच मूळ विषयावर यावं अशा प्रकारचा गंभीर चेहरा करून दमयंती म्हणते:—" मग मी तुला मांगितलं होतं त्या कामाचं काय झालं ?"

**सुदेवः**—" पर्णादाकडून त्याला माहित असलेली सगळी माहिती मी मिळविली."

**दमयंतीः**—( उत्सुकतेनें ) " मग तुझं काय मत आहे ?"

**सुदेवः**—" बाहुकाच्या आणि तुमच्या प्रसंगांत साम्य आहे खास; पण बाहुकाच्या कुरुपतेचं काय ?"

**दमयंतीः**—" सुदेवा, अरे रें तुझ्या कसं लक्षांत येत नाही की आपल्याला कोणी ओळखून आपला अधिकच अपमान करूं नये म्हणून त्यानी हें नाटक केलं असावं ?"

**सुदेवः**—" तुमच्या म्हणण्यांत जरी पुष्कळच तथ्य असलं तरी बाहुक म्हणजेच नलराज हें आपल्याला नक्की कसं ठरवितां येईल ?"

**दमयंतीः**—" आहे ! सुदेवा, त्यालाही मार्ग आहे. पण तो तुम्हाला पटेल कीं नाही कुणास ठाऊक."

**सुदेवः**—" तो कोणता मार्ग देवि ?"

इतक्यांत महादेवी दारांत आलेल्या असतात आणि त्यानी हें वाक्य ऐकलेलं असतें; त्या थोडाशा रागानेंच दमयंतीकडे पहात सुदेवाला उद्देशून म्हणतात.

" ठाऊक आहे मला तो मार्ग......"

दमयंतीजवळ बसून तिच्या पाठीवरून हात फिरवीत " सुदेवा, आमच्या भीमिचं किनई डोकं फिरलंय् अगदीं आतांशा......"

**दमयंती**—( आर्जवयुक्त स्वरानें ) " अग पण आई, मी काय म्हणते तें तर कळूं दे त्याला."

**महादेवी**—" हं ऽ ! बरं चालूं द्या."

**दमयंती**—" सुदेवा, इथून आयोध्यानगरी किती दूर आहे ?"

**सुदेव**—" शंभर योजनांहून कमी खास नाही."

**दमयंती**—" सुदेवा, तुला हें ठाऊक आहे ना को इहलोकीं तरी नलराजा-इतका अश्वविद्येंत प्रवीण दुसरा कोणी नाहीं."

**सुदेव**—" अजून तरी दुसऱ्या कोणाचें नांव मी ऐकलें नाही."

**दमयंती**—" आतां बाहुकानें वर्णिलेला आणि आमचा प्रसंग यांत पुष्कळ साम्य आहे हे तुला कबूल आहेच. मग आपण असं करूं. बाहुकाला एका दिवसांत इथें रथानें यायला भाग पाडूं; अन् तो जर येऊं शकलाच तर बाहुक म्हणजेच नलराजा हें आपोआपच सिद्ध होईल. कारण नलाशिवाय इतकें अंतर एका दिव-सांत कापणें दुसऱ्या कुणालाही शक्य नाही ! काय ?"

**सुदेव**—" तुम्ही म्हणतां हें कांही चूक नाही. पण हें होणार कसं ?"

**दमयंती**—" कसं तें दूतांच्या दालनांत सांगेन. कारण तें गुप्त ठेवणंच इष्ट आहे."

## ( ९ )

## दूतांचे दालन

**सुदेव**—" काय बोलतां आहां तुम्ही हें देवि. तुम्हींच बोलतां आहांत म्हणून बरं. दुसरा कोणी असता तर त्याची मी गर्दनच उडविली असती."

**महादेवी**—" बघ भीमे, पटलं ना. आतां तरी मी काय म्हणत होते तें ?"

**दमयंती**—" सुदेवा, मी हे सुखासुखी का म्हणते आहे ? पण मी तरी काय करूं रे ? माझ्यानं रहावत अतां. इकडची कांहीच बातमी नव्हती तंवर निरा-शेनं कपाळाला हात लावून बसणंच भाग होतं. पण या अंधुक आशेनं, या आशा-निराशेच्या ओढाओढीत माझ्या गळ्याला फांस बसतोय्. जीव कासावीस होतो रे ?"

**सुदेव**—" पण देवि, असं भलतंच धाडस करून कसं बरं चालेल ?,'

**दमयंती**—" सुदेवा, कसं रे तुला पटवूं ? प्राणांपेक्षांही ज्यांचं मोल मला जास्त आहे त्यांच्यासाठी कोणतं धाडस मी करणार नाहीं ? सुदेवा, तुम्हीं कधीं

कुणावर माया केलीच नाहीत कारे ! आपले पांची प्राण ओवाळून टाकावं असें तुम्हांला कधींच कुणाबद्दल वाटलं नाहि कारे !......(थोडेसें थांबून दमयंती सुदेवाकडे टक लावून पहाते. सुदेवाची नजर खाली वळतें. दमयंती पुनः बोलूं लागते. )......" साहसानंच श्री मिळते म्हणतात मग माझ्या सौभाग्यासाठी एकादं साहस करायला मी कां बरं मागें पुढें पहावं ! "

**सुदेव**—" देवि, हें जरी खरं असलं तरी लोकापवादाकडेही आपल्याला जरा पाह्यलं पाहिजे. "

**दमयंती**—" लोकापवाद ! हंः ! जिच्या सर्वस्वाचा नाश झाला आहे तिला लोकापवादाची कसली भीति दाखवितोस ! अन् आज तरी काय लोकं मला नांव ठेवीत नसतील ? ज्याना रूप नसेल त्यानींच आरशांत पहावं, अन् ज्यांचं मन निष्पाप नसतील त्यानीच लोकनिंदेची भीति बाळगावी..."

**महादेवी**—" तुझं तत्वज्ञान जरी खरं असलं तरी आपल्याला या जगात राह्यचंय ना ! "

**दमयंती**—" या असल्या जिण्याचा वीट आलाय मला अगदीं, लौकर निरोप मिळेल तर बरं. "

महादेवी दमयंतीच्या तोंडावर हात ठेवीत म्हणतातः—

" असं बोलू नये बाळ ! असा कां बरं त्रागा करावा माणसानं. दमयंती महादेवीच्या कुशींत शिरून एकदोन हुंदके देत असते. त्यावेळी सुदेव विचारतोः—

" अन् समजा देवि, बाहुक म्हणजेच नलराजा असला, तरी तुमचा निरोप ऐकून त्याची काय बरं स्थिती होईल ! अन् राजाच्या मनानं तुमचा निरोप खराच मानला तर केवढा बरं घात होईल ! संशयाची मुळं फार खोल जातात बरं ! "

**दमयंतीः**—( झटक्यानें तोंड वर करून अगदी दीनतेनें म्हणते. )

" सुदेवा, नको माझा अंत पाहूं. माझ्या या भित्र्या मनाला अधिकच भिववूं नकोस. जा, जा, सुदेवा माझं भित्रं मन माघार घेत नाही. तंवरच निघून जा. माझ्या आयुष्यांतील एकच एक सुवर्णसंधि गमावूं नकोस. आपल्या लाडक्या भीमेचं सौभाग्य तिला परत मिळवून दे......"

**सुदेवः**—" भगिनी, तइयासाठीं मी काय करणार नाही ! हा निघालोंच बघ ! "

सुदेव दोघीनांही प्रणाम करून निघून जातो: आणि मग दमयंती आईकडे वळून लाडिकपणानें व थोडेसें घाबरून म्हणते:—

" अन् आई, तूं हें बाबांना कळूं देऊं नकोस हं अगदीं माझ्या गळ्याची शपथ ! "

**महादेवीः**—" भीमे, तूं किनई अजून पहिल्यासारखीच हट्टी आहेस बघ. आपलं तेवढं खरं; हो ना ? " असं म्हणतां म्हणतां महादेवि प्रेमानं दमयंतीची हनुवटी आपल्या हातीं घेतात व वत्सलतेनं तिचें चुंबन घेतात.

## ( १० )

## अयोध्या नगरी

ऋतुपर्णाच्या राजवाड्यांतील एक दालन. एका उच्चासनावर लोडाला टेकून ऋतुपर्ण बसला आहे. त्याच्या मागें एक दासी उभी असून ती त्याला वारा घालीत आहे. त्याच्या समोरच थोड्या अंतरावर दुसऱ्या एका उच्चासनावर पूर्वीच्याच वेषांत सुदेव बसलेला आहे.

**ऋतुपर्णः**—" काय सुदेवा, इकडे कोणीकडे ? "

**सुदेवः**—( नम्रपणें ) " कांहि नाहीं सहज आलो होतो इकडे. म्हटलं आपली भेट घेतल्याशिवाय कसं पुढं जायचं ? "

**ऋतुपर्णः**—" तुमच्या कुंडिनपूरची कशी काय हालहवाल ? "

भीमराजा खुशाल आहे ना ? अन् कायरे त्या नलाचा कांहि पत्ता आहे कारे ? कारण नलाचा सारथि जो वार्ष्णेय त्यानं मला सांगितलन् कीं नलानं जुगारांत सारं राज्य गमावलं अन् आतां कुठं तरी तोंड लपवीत फिरतो आहे. खरंच माणसांची बुद्धी कधीं अन् कशी फिरेल कांहीं सांगवत नाही बाबा. "

**सुदेवः**—( साश्चर्य मुद्रेनें ) "काय ! वार्ष्णेय आपणांकडे आहे ! चला खरं झालं ! बाकी गुणांचं चीज रसिकांकडूनच होणार म्हणा."

सुदेवाचं शेवटचं वाक्य आपल्यालाच उद्देशून आहे हें जाणून ऋतुपर्ण किंचित् स्मित करतो. व अधिकच मोकळेपणानें सुदेवास म्हणतो. "बरं का सुदेवा ! मी एक नवीन अश्वाध्यक्ष नेमला आहे. त्याचं नाव बाहुक. त्याची अश्व-विद्येची बढाई ऐकून खचित कुणालाही हसूं येईल. म्हणे एका दिवसांत शंभरांवर योजने मी तुम्हांला नेऊं शकेन. म्हणावं या ऋतुपर्णाशी गांठ आहे. वेळेवर नेलं नाही तर डोकंच उडवीन......तसं म्हटलं तर मनुष्य मोठा गुणी दिसतो हं इतरही पुष्कळच कला त्याला अवगत आहेत ( जरा थांबून, कांहीं विनोद सुचल्या-सारखें करून )...अन् कारे सुदेवा, विद्या अन् लक्ष्मी यांचं वांकडं आहे म्हणतात, तसं गुण आणि रूप यांचंही पटत नाहीं की काय ?

असें म्हणून ऋतुपर्ण स्वतःशींच मोठ्यानें हंसतो.

**सुदेवः**—" आपलं म्हणणं माझ्या नाही ध्यानांत आलं ! "

**ऋतुपर्ण**—" अरे, त्या बाहुकाबद्दलच बोलतोंय मी. इतका गुणी मनुष्य पण रूपाबद्दल अगदी विचारूं नकोस. रूप तर नाहीच पण पुन्हां एक हातही आंखुड आहे राजश्रीच"

ऋतुपर्ण पुनः मोठ्यानें हंसतो. सुदेव गंभीरपणें उत्तरतो.

" रूपांत काय आहे राजा ! खरं सौंदर्य गुणांतच असतं. शिवाय गुण मिळ-पणं माणसांहाती असलं तरी रूपाचा बोल मात्र दैवालाच लागूं शकेल "

**ऋतुपर्ण**—"खरं आहे सुदेवा, खरं आहे..."

**सुदेव**—"आणि राजन्, बाहुकाची परीक्षा आपल्याला पहायचीच आहे. म्हणतां तर तशी सुसंधीही आली आहे असं म्हणायला कांही हरकत नाहीं. "

**ऋतुपर्ण**—"कसली सुसंधि सुदेवा बोल, लवकर बोल ! "

**सुदेव**—"आपल्याला ठाऊक नाहीं राजन्, दमयंतीनें दुसरं स्वयंवर मांडलं आहे तें ! "

**ऋतुपर्ण**—( आश्चर्याचा धक्का बसल्याप्रमाणें ) " काय सुदेवा भलतंच कांही तरी बोलतोस ! अरे जिनें प्रत्यक्ष लोकपालांनीं टाकुन नलाला वरलं ती काय पुनः स्वयंवर करून एखाद्या यःकश्चित् भूपालाच्या गळ्यात माळ घालणार आहे ? उगाच आपली थाप द्यायची म्हणजे काय ? थट्टेला तरी कांही ताळ-तंत्र असावा. "

**सुदेव**—" राजन्, आपली थट्टा करून मृत्युला कोण बोलवणं करील ? माझे प्राण मला अजून नकोसे झाले नाहीत ! आपण मला ममतेनें वागवतां म्हणून आपलं प्रिय व्हावं असं मला सहाजिकच वाटलं ! साऱ्या भरतवर्षांतल्या राजांनी कुंडिनपुरांत केवढी दाटी केली आहे. अन् अजून आपण इथंच. तरी मला शंका आलीच होती की आपल्याला बहुतेक या गोष्टीची गंधवार्ताही नसेल.. ( जरा थांबून ).. असो माझं कर्तव्य मी केलं. आपले आपण मुखत्यार आहांत.. "

**ऋतुपर्णः**–"अरे पण सुदेवा, स्वयंवर आहे केव्हां हें ? तर तूं सांगितलं नाहीस "

**सुदेवः**—कुंडिनपुराहून निघून उद्यां मला चार आठवडे होतील. स्वयंव-राच्या वेळेची मुदत बरोबर उद्यांच संपणार आहे. "

**ऋतुपर्णः**—" काय ? इतकी जुनी बातमीही आम्हाला कळूं नये हं ? आमचे हेर काय झोंपा घेत आहेत ? आणि भीमानं तरी आम्हालाच खड्यासारखं कां बरं वगळावं ? भीमाला म्हणावं ऋतुपर्णाशी असं अकारण वैर करणं बरं नव्हे... असो. जा तूं सुदेवा ! तुझं कुशल असो. माझं हें काम फत्ते झालं तर तुला कमीत-कमी दोनचार गावांचा राजाच करीन."

**सुदेव**—" राजन्, आपली कृपा असल्यांवर मला काय कमी आहे ? बरं आहे. मी येतों तर. शुभास्ते पंथानः संतु ! "

सुदेव जातांक्षणींच ऋतुपर्ण म्हणतो " कोण आहेरे तिकडे ? " एक हुजऱ्या समोर येऊन प्रणाम करून उभा राहतो. त्याला ऋतुपर्ण म्हणतो. " जारे, अश्वाध्यक्षांना घेऊन ये लवकर. "

हुजऱ्या गेल्यावर ऋतुपर्ण आपल्याशींच विचार करीत बसतो; तो मध्येंच हातावर हनु ठेऊन विचार करीत बसतो; मधूनच रागारागानें आजूबाजूला पहात मिशीला पीळ घालूं लागतो; मध्येंच सुखद विचारांत गढून गेल्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर स्मित झळकतें. चिंता, क्रोध आणि आनंद यांचा हा लपंडाव त्याच्या मनः-प्रांगणांत चालूं असतो; आणि या धावत्या विकारांच्या पळत्या छायांची द्रुतक्रीडा त्याच्या मुखावर चाललेली कुणालाही दिसण्यासारखी असते. त्या ऋतुपर्णाच्या मनाच्या चंचल अवस्थेकडे पहात आणि आपल्या मनांशीच त्या मजेदार दृश्याचा आनंद उपभोगीत किंचित् सस्मित मुखानें एक दासी ऋतुपर्णाला वारा घालीत असते. मध्येंच तिच्याकडे वळून रागानें पहात ऋतुपर्ण उद्‌गारतो.

" ए बया! मघापासून पहातोय् मी, नुसती पुतळीसारखी उभी आहेस. वारा कोण घालील तुझा काका? किती ऐदी झाले आहेत नोकर तरी!......"

ती दासी म्हणजे सहनशीलतेची खरोखरीच पुतळी असते की काय कुणास ठाऊक; एखादं माणूस उगीचच रागावलं आहे असं ठाऊक असलं आणि त्याला आणखीनच् चिडवायची आपली इच्छा नसली म्हणजे त्या प्रसंगाची मजा वाटून आपण जसें स्वतःशीच थोडेसें स्मित करतों तसें स्मित करून ती दासी पुनः वारा घालूं लागते. राजाचें मनावर आतां चिंतेचा पगडा बसतो. तो दासीकडे वळून तिला विचारतो:—

" कां ग! हा बाहुक नेईल का मला शंभर योजनें एका दिवसांत ?"

दासी कांहींच न बोलल्यामुळें राजा पुनः विचारांत गढून जातो. मध्येंच तो स्वतःशीच पुटपुटतो " बाहुक जर मला नेऊं शकला तर काय [illegible] होईल!"

इतक्यांत बाहुक समोर येऊन प्रणाम करून उभा राहतो; त्याच्याकडे पाहून ऋतुपर्ण लाघवी स्वरानें बाहुकास म्हणतो.

" यावं यावं अश्वाध्यक्ष. खरंच बाहुका, तुझ्या गुणांनी तूं मन[illegible] दिवस जास्तच जास्त प्रिय होत चालला आहेस. कुठून रे पैदा केलीस ही गुणां[illegible] देणी!"

बाहुक नम्रपणें उत्तरतो:—" आपल्यासारख्या गुणज्ञ राजांच्या पदरी मला रहायला मिळालं हें मी माझं महद्भाग्यच समजतो......!

ऋतुपर्णः—"पण बाहुका, आतां मात्र तुझ्या परिक्षेची वेळ आली आहे हां!"

बाहुकः—" महाराजांनी आज्ञा मात्र करावी."

ऋतुपर्ण—" ठीक आहे! आजच्या सूर्यास्ताच्या आंत आपल्याला कुंडिनपुराला गेलं पाहिजे. कुंडिनपुराचं नांव ऐकतांच बाहुक केवळ्यानें तरी दचकतो. तें पाहून इतक्या दूरच्या नगरीचें नांव ऐकल्यामुळेंच बाहुक घाबरला असें वाटल्यामुळें ऋतुपर्णाचा पारा थोडा चढतो. पाहूं आतां तुमच्या फुशारक्यांत किती तथ्य आहे तें जर का उद्यां दमयंतीचं स्वयंवर चुकलं तर या ऋतुपर्णाशी गांठ आहे. ( दमयंतीचं स्वयंवर' हें शब्द ऐकून बाहुकाचा चेहरा पार उतरून जातो. तो विवर्ण चेहरा पहाताच ऋतुपर्ण फारच चिडून जातो; व एकदम उसळून म्हणतो ):— कां ! आतां कां तोंड बंद झालं ! दहा दहा हात बाता मारतांना लाज नाहीं वाटली ! दहा हजारांचं वेतन फुकट मिळत नसतं; वेळीं त्याला प्राणांचं मोल द्यावं लागतं......!"

ऋतुपर्णाचं त्राग्याचं बोलणं बाहुकाला लागतं; आणि तो करारी मुद्रेनें आणि स्वाभिमानपूर्ण स्वरानं उद्गारतो.

" महाराज असं अविचारीपणानं बोलणं आपल्यासारख्या महाभागांना शोभत नाही. परीक्षेची वेळ आल्यामुळें मी घाबरून गप्प बसलों असं नव्हे. परन्तु दमयंतीसारख्या जगद्विख्यात साध्वीनं पुनः स्वयंवर आरंभिलं हें ऐकून मी क्षणभर दिङ्मूढ झालों ! तें असो. मला त्या गोष्टीशी कांहीच कर्तव्य नाही. अश्वशाळेंतले उत्तम अश्व शोधून मी रथ जोडून आणतों, आपण मात्र तयार असावें ! .."

बाहुकाचें हें शब्द ऐकून राजाला खरोखरीच आनंद होतो. व तो समजावणीच्या, सलगीच्या स्वरानें म्हणतो:—

" बाहुका माझं बोलणं तूं मनावर घेऊं नकोस. माझा चंचल स्वभाव तुला माहीत आहे ना ! अन् आपल्या माणसावर असा राग धरणं चांगलं नाही. तुझ्या

गुणांची मला पारख का नाही! उगाच तुला जरा चेतवावं म्हणून तसं बोललों मी!......"

**बाहुकः**—"महाराज, आपण सहजच बोललांत पण माझ्या मात्र उरीं घाव लागला असो. आतां होईलच माझी परीक्षा. पण महाराज, गरीबांच्याही शब्दाला मोल असतं हें आपल्याला दिसून येईल. अन् तें मोल तरी किती भयंकर असतं; एकेका शब्दगणीक त्यांना आपले प्राण वेंचावे लागतात!"

**ऋतुपर्णः**—(त्याच्या चंचलवृत्तीला अनुसरून खजील होऊन तो सद्‌गदित आवाजानें म्हणतो)—जा, जा, बाहुका! किती लाजविशील आतां! तूं माझं प्रियच करशील ही माझी खात्री आहे..."

बाहुक प्रणाम करून जातो.

## ( ११ )

राजवाड्यांतून निघून (नल) बाहुक उद्यानांतून अश्वशालेकडे जाणाऱ्या एका मार्गानें जात असतो. त्याचं मस्तक अवनत असतं; त्याची नजर भूमीकडे वळलेली असते. त्याची गति अति मंद असते, त्याचीं पावलें इतकी जड पडत असतात कीं जणूं अश्वशाळेकडे जाण्याची त्यांची इच्छाच नसते, आणि निव्वळ नाइलाज म्हणूनच तीं तिकडे जात असतात-ओढून नेल्याप्रमाणें जात असतात बाहुक स्वतःशींच विचार करीत व मधूनच आपल्याशींच पुटपुटत चाललेला असतो. बाहुक स्वतःशीच पुटपुटतो.

"हर! हर! काय ऐकलं मी हें? दमयंति, तूं खरंच का असं केलं असशील? छे! छे! तिचं डोकंच फिरलं असेल. दुःखानं तिच्या मनाचा तोल गेला असेल ...कीं माझंच डोकं फिरलं आहे? राजाची आज्ञा तरी मला बरोबर कळली ना?..."

बाहुक आपलं पुटपुटणं थांबवून दोनचार पावलं पुढं जातो. आणि मग थांबून दुःखी चेहरा करून तो पुनः बोलूं लागतो—

" किती नीच मी. त्या निराधार अबलेला फसवून एकटीच वनांत सोडून मी निघून आलों. वैदर्भि, तूं तरी माझ्यावर कां रागवूं नयेस ? पण हे साध्वि, ही सूडबुद्धि तुझ्या उदार मनाला शोभत नाही. असला नीचपणा तुझ्या हातून कधींही घडणार नाही..."

दोनचार पावलें चालून गेल्यावर बाहुक एकदम थबकून उभा राहतो. त्याच्या चेहऱ्यावर आशेचा फुलोरे फुलतो. तो एकदम स्वतःशीच म्हणतो "असं तर नसेल ? मी यावं म्हणून तर तिनें असला साहसी उपाय योजिला नसेल ? छे ! छे ! पण किती वेडा मी ! तिला काय कल्पना मी ऋतुपर्णाकडे आहे म्हणून ?......' याही प्रश्नाची अशी विल्हेवाट लागल्यानंतर तो पुनः चालूं लागतो. आतां अश्वशाला शंभर कदमावर आलेली असते, पण याची बाहुकाला दादही नसते. तो तसाच पुढें चाललेला असतो. तो मध्येंच पुटपुटतो.

" काय ? वियोगानं तिचं माझ्यावरील प्रेमही नाहीसं झालं असेल ? छेः ! छेः ! . मग कुणी सांगावं ? तसं असेलही कदाचित् ! "

बाहुक तसाच पुढें चालूं लागतो. दहा पांच हातांच्या अंतरावर दिसणाऱ्या जीवलाकडे त्याचें लक्षही नसतें.

जीवल बाहुकाकडे पाहून सहानुभूतीच्या स्वरानें म्हणतो—

" का ? अश्वाध्यक्ष, काय झालं ? "

जीवलाकडे पहात पोटामध्यें न मावणाऱ्या रागाला शब्दांच्या रूपानें वाट करून देत बाहुक उद्गारतो—

" काय झालं अन् काय नाही ! जीवल ! एकूण स्त्री जात तेवढी सारी बेहराम ! "

**जीवल**—" पण असं झालं तरी काय बाहुका ? "

**बाहुक**—" या सृष्टीचा अंत आतां नजीक आला आहे जीवल ! अरे एवढ्या तोऱ्यानं लोकपालांकडे पाठ फिरविणारी दमयंती पुनः स्वयंवर आरंभील असं कुणाच्या स्वप्नांत तरी आलं असतं का ? "

**जीवल—**" काय ? तुम्ही बोलतां आहांत तरी काय हें बाहुक ? अहो ती तर मोठी पतिव्रता म्हणून प्रसिद्ध आहे. आणि नलाच्या प्रेमासाठींच ना तिनें लोकपालांना नकार दिला ? "

**बाहुक—**" पतिव्रता ऽ ! प्रेऽम ! जीवल, स्त्री आणि चांचल्य ही काय दोन आहेत ? "

**जीवल—**" अन् तरी तिला दोन मुलं आहेत बरं बाहुका ! वार्ष्णेयानं सांगितल न् मला हें ! खरं म्हणजे तिनं तर नलाच्या नांवाचा अगदी ध्यास घ्यायला पाहिजे. "

**बाहुक—**" अरे बाबा, मलाही तसंच वाटलं होतं ! माझ्या कल्पनेप्रमाणें तर तिला नलाशिवाय दुसरं कांही सुचूंही नये; जीवितही असह्य व्हावं ! "

**जविल—**" जाऊं द्या ! आजकाल दुनिया बिघडली आहे हेंच खरं. अन् आपल्याला काय करायच्या या मोठ्यांच्या भानगडी ? मोठं तितकं सारं खोटं यांत संशय नाही. "

**बाहुक—**" तसं जरी असलं तरी हे खरं असावसं वाटत नाही. कुंडिनपुराला गेल्यावर कळेलच मग खरं खोटं काय तें .....चल, चल, जीवल ! आपण गप्पा काय मारतों आहोंत. तिकडे गहजब केला असेल ना महाराजांनी ! "

## ( १२ )

## ऋतुपर्णाच्या राजवाड्याचा दर्शनी भाग.

राजवाड्याचं जोतं उंच असल्यामुळें राजमहालांत जातां यावं म्हणून पंचवीस तीस अशा लांबरुंद पायऱ्या बांधलेल्या असतात. त्या पायऱ्यांच्या वर उंचच उंच कमानींनी एक रुंद अशी पडवी साधलेली असते. कमानींच्या खांबाशीं हत्यारबंद शिपाई उभे असतात. अशाच एका खांबाशी प्रवासाचा पोषाख करून ऋतुपर्ण उभा असतो; व त्याच्या जवळच थोडा मागच्या बाजूला, असा वार्ष्णेय उभा

असतो. ऋतुपर्ण आणि वार्ष्णेय यांच्यामध्यें संभाषण सुरू असतें, आणि मधून मधून भिंवया जवळ हात नेऊन ते दोघेही दूर न्याहाळून पहात असतात.

ऋतुपर्ण स्वतःशीच पण जरा मोठ्यानें आणि त्रासिक आवाजानें बोलतो.

"आतां काय करावं या बाहुकाला ? नुसता एक रथ जोडायला इतका उशीर ! कमाल आहे बुवा !"

**वार्ष्णेय**—"चांगले घोडे शोधून काढायला जरा वेळ लागला असेल बहुतेक निघालेंच असतील ते आतां !"

**ऋतुपर्ण**—"काय, निघालेच काय असतील ! अरे, एक एक क्षण म्हणजे आज पृथ्वी मोलाचा आहे ! जा, जा, बघ बरं काय करतो आहे बाहुक तें. जा लौकर !

वार्ष्णेय पांच सहा पायऱ्या उतरतो तोंच दूरून रथाचा आवाज ऐकूं येऊं लागतो; आणि क्षण दोन क्षणांत रथही दिसूं लागतो. तें पाहून ऋतुपर्ण म्हणतो.

"अरे ! आलाच वाटतं बाहुक ? वार्ष्णेया बाहुकच ना तो ?

**वार्ष्णेय**—"होय महाराज ! बाहुकच तो."

वार्ष्णेय इतकें बोलून पायऱ्या उतरतो न उतरतो तोंच रथ पायऱ्याशी येऊन उभा राहतो, व बाहुक रथांतून उतरून ऋतुपर्णाला प्रणाम करतो. ऋतुपर्ण त्याचा प्रणाम घेत घेत घाईघाईनें पायऱ्या उतरतो व अधीरतेनें बाहुकाला म्हणतो.—

"कितीरे उशीर केलास बाहुका ! म्हटलं आज येतोय कीं नाही रथ !" इतक्यांत त्याची नजर घोड्यांकडे वळते व त्यांकडे पाहून तो तुच्छतेनें म्हणतो.

"अन् ही रे कुठली तट्टं आणलीस ? आम्हांला आज विदर्भाला न्यायचं आहे कीं नाही तुझ्या मनांत ?"

बाहुक जरा कुऱ्यानेंच म्हणतो. "माझ्या मतें, हे सिंधुदेशचेच अश्व आपलं काम करतील. आपली नापसंती असेल तर आपण सांगाल ते दुसरे अश्व मी रथास जोडतों."

आपलें बोलणें बाहुकाला जरा लागलेंसें पाहून त्याला खूष ठेवण्याऱ्या इराद्यानें ऋतुपर्ण म्हणतो.

"अरे, मला काय समजतंय त्यांत! तुला योग्य वाटेल तेंच तूं कर! अश्व-विद्येंत तुझा हात धरणारा इहलोकीं कुणी नाहीं हें का मला ठाऊक नाहीं ? चल, चल, लौकर, आतां उशीर नको उगीच" ( असें म्हणत म्हणत ऋतुपर्ण रथावर चढतो. त्याच्या मागोमाग बाहुकही चढतो. त्यास पाहून ऋतुपर्ण घाईघाईनें आणि जरा चांचरत बाहुकास म्हणतो ).

"बाहुका! वार्ष्णेयाला येऊं दे आपल्याबरोबर तुलाही मदत होईल! नाही?"

बाहुक नुसतें 'हूं:' करतो. पण पडत्या फळाची आज्ञा घेणारा ऋतुपर्ण रथाजवळच उभा असलेल्या वार्ष्णेयाला म्हणतो; "वार्ष्णेया; चढ वर! तूं ही कांहीं कच्चा गुरूचा चेला नाहीस. नलाजवळ जें तूं इतके दिवस काढलेस ते कांही अगदींच वाया गेले नसतील"

वार्ष्णेय बसल्याबरोबर ऋतुपर्ण बाहुकास उद्देशून म्हणतो.

"हं! बाहुका चालू दे!

ऋतुपर्णाच्या आज्ञेनुसार रथ एकदम चालूं लागतो; त्याच्या चाकांचा गंभीर आवाज होऊं लागतो; व अश्वांच्या गळ्यांतील मंजुळ घुंगुरांचाही सुमधुर ध्वनि ऐकूं येऊं लागतो.

रथ झपाट्यानें जात जात एका दूरच्या वळणाआड अदृश्य होतो.

## ( १३ )

ऋतुपर्णाचा रथ वायुवेगानें जातांना दिसतो आहे. बाहुक रथ चालविण्यांत अगदीं दंग झाला आहे; आणि त्याच्याकडे आश्चर्यानें आणि कौतुकानें पहाणाऱ्या वार्ष्णेयाचा चेहरा एखाद्या भाबड्या बालकासारखा दिसतो आहे. ऋतुपर्ण रथांतल्या लोडाला टेंकून ऐटींत बसला आहे—ऐश्वर्याचा मनसोक्त उपभोग घेऊं शकणाराच

मनुष्य अशा रुबाबानें बसूं शकतो. ऋतुपर्णाच्या चेहऱ्यावर रथाच्या वायुसारख्या वेगामुळें त्याचा मनाला वाटणारा आनंद आणि उत्साह याचें स्पष्ट प्रतिबिंब उठलेलें आहे. त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलं असतांना हें कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखं आहे कीं, याला वायुगतीनं चालणाऱ्या वाहनांची आवड आहे. त्याच्या चेहऱ्यावरून तरी असं अनुमान खास करतां येण्यासारखं आहे कीं वायुवेगाचा हा अनुपम आनंद कसा अन् किती उपभोगूं असं त्याला होऊन गेलं आहे. तो मध्येंच आजूबाजूला पाहतो आणि मध्येंच बाहुकाच्या कौशल्याचं निरीक्षण करण्यांत गढून जातो. अशाच एका प्रसंगी त्यानें आपल्या खांद्यावर टाकलेला शेला त्याच्या खांद्यावरून रथामागच्या भागांतून उडून जातो. शेला उडतां उडतां त्याचें शेवटचें टोंक ऋतुपर्णाच्या कानाला स्पर्श करून जातें व त्यामुळें दचकून तो आपल्या कानांवर माशी वगैरे बसली असेल या शंकेनें आपला हात झाडतो. आणि मग सहजच त्याचा हात खांद्याकडे जातो. पण तेथें शेला हाताला न लागल्यामुळें तो अगदीं गडबडून जातो. तो रथांतल्या आंतल्या बाजूला चांचपडून पहातो; पण तेथेंही शेला हातीं न आल्यामुळें तो मागें वळून पाहतो तों दूर अंतरावर उंच उडून हळूहळू जमीनीवर पडणारा शेला त्याला एखाद्या कापसाच्या पुंजक्यासारखा दिसतो. तो लगेच बाहुकाला एक दोन हांका मारतो. पण एकतर रथाच्या आवाजामुळं बाहुकाला ऋतुपर्णाची हांक ऐकूं जात नाही; किंवा तो रथ चालविण्यांत इतका मग्न असतो की त्याचें तिकडे तितकेसें लक्षही नसतें—ऋतुपर्ण पुनः मागें वळून पहातो तों रस्त्याच्या पृष्ठभागाला किंचित् स्पर्श करणारा तो शेला ऋतुपर्णाला धुक्याप्रमाणें पुसट पुसट दिसतो. ऋतुपर्ण पुनः बाहुकाकडे वळून त्याच्या खांद्यावर हात ठेऊन त्याला थोडासा हालवितो. बाहुक दचकूनच मागें पहातो. ऋतुपर्ण त्याला म्हणतो:—
"माझा शेला ऽऽ!"

बाहुक नुसतें 'हूं' च करतो. तें पाहून ऋतुपर्ण म्हणतो:—

"माझा शेला उडाला!" आणि तो बाहुकाला रथ थांबविण्याची खुणेनेंच आज्ञा करतो. बाहुक थोडासा मागें वळून मोठ्यानें म्हणतो: "शक्य नाहीं. शेला एक योजन मागें राहिला! अश्व फार वेगानें जात आहेत!"

ऋतुपर्ण निराशेनें मागें वळून पहातो तर खरोखरीच त्याला शेला मुळींच दिसत नाहीं.—ऋतुपर्णानंतर वार्ष्णेयही आपल्या आसनावरून तोल सांभाळून उठतो व मागें नजर टाकतो, परंतु त्यालाही शेला दिसत नाहीं. या घटनेमुळें त्याच्या मनांत नलाबद्दल अति आदर उत्पन्न होतो. व आतांपर्यंत नलाला जवळ पास चिटकून अगदी सलगीनें बसणारा वार्ष्णेय नलाकडे आदरानें पहात त्याच्या पासून त्यांतल्या त्यांत जरा दूरच बसतो.

बाहुकाचें या गोष्टीकडे लक्षच नसतें. जणूं मध्यें कांहीं अडथळा आलाच नाही अशा तन्मयतेनें तो रथ हांकीत असतो.

## ( १४ )

## भीमराजाच्या अंतःपुरांतील एक उद्यान

सूर्यास्ताला अर्ध्या पाव घटकेचा अवकाश आहे; सूर्यास्तापूर्वीचा फिकट पिवळा उजेड मनावर एक प्रकारचें दडपण टाकीत आहे. पण या असल्या उजेडा-कडे पहायला दमयंतीला किंवा तिच्या बछड्यांना वेळ कुठें आहे—दमयंतीच्या दासीही खेळांत बालकाप्रमाणेंच दंग होऊन गेल्या आहेत.

एकाद्या लहान मुलाप्रमाणें आपले डोळे आपणच झांकून दमयंती निष्पाप आनंदी चेहऱ्यानें एका टेंगण्याशा शिलासनावर बसलेली आहे. इतक्यांत कुठूनसा एक अति गोड लाडिक आवाज ऐकूं येतो. गडी सू ऽ ऽ च्यो !

दमयंती आपणाशीच खुदूकन् हंसून डोळे उघडते व इकडे तिकडे पाहूं लागते पण तिला कोणीच न दिसल्यामुळें आतां काय करावे याचा ती विचार करूं लागते. इतक्यांत एका झाडाच्या आडून एक मधुर हांक ऐकूं येते.

"आमी कू ऽ ऽ टें"

त्या हांकेच्या रोखानें पहातांच एका झाडाआडन डोकावून पहाणारें इंद्रसेनेचें सस्मित मुख दमयंतीच्या दृष्टीस पडतें. ती 'अग ऽ लबाडे ऽ' असें मोठ्यानें म्हणत

इंद्रसेनेकडे धांवत जाते. आपल्याकडे इतक्या वेगानें आई येईल ही कल्पना नसल्यामुळें इंद्रसेना घाबरून ओरडते. " आ ऽ हा हा हा ऽ ऽ ! "

दमयंतीही ' कशी ऽ सापडली ऽ ! ' असें म्हणत तिला धरूं लागते तों ती अवखळ पोर शुद्धीवर येऊन थोडी बाजूला होते व मोठ्यानें किंचाळत धावूं लागते.

इकडे इंद्रसेनेच्या मागें दमयंतीनें लागूं नये म्हणून इंद्रसेन टाळ्या वाजवून दमयंतीचें लक्ष आपल्याकडे ओढतो. दमयंती धावत त्याला धरणार तोंच इंद्रसेना आपल्या भावाच्या मदतीला येते.

अशा तऱ्हेनें हांसत खिदळत आपल्या मुलांचा पाठलाग करीत असतां दमयंतीला तिच्या पूर्वायुष्यातील एका प्रसंगाची आठवण होते; व एक क्षणभरच कां होईना तो प्रसंग तिच्या डोळ्यांपुढें उभा राहतो. आणि वायुच्या वेगानें तो नाहीसा होतो. त्या प्रसंगाचा विचार आणि तो प्रसंग डोळ्यांपुढें उभा असतांना दमयंती अर्थांत्च धांवताधांवता क्षणभरच थबकून उभी झालेली असते. तो प्रसंग असा— चारी बाजूला आनंदाच्या, भीतीच्या, कौतुकाच्या किंचाळ्या मारीत आपला सखीगण हिमधवल हंसांच्या मागें धांवत आहे. आपणही सुवर्णरंगी चोंच असलेल्या एका राजहंसाच्या मागें धावत आहोंत. तो हंसही अगदी आपल्या हातांत आल्यासारखा होऊन कुशलतेनें आपणाला चकवीत आहे. हंस थोडासा दूर गेल्यावर आपणही त्याला पकडायला जपून सावधगिरीनें पाऊलें टाकीत आहों; इतक्यांत मनुष्य वाणीनें तो हंस आपल्याला उद्देशून बोलतो आहे. " दमयंति, अश्विनीकुमारांहूनही सुंदर, जणूं मूर्तिमंत मदनच अशा निषधाधिपति नळाचें नांव तूं ऐकलें आहेस काय ? या तिन्ही लोकांत, हे सुंदरि, त्याच्या सौंदर्याला तोड नाहीं. तुझेंही लावण्य तसेंच अप्रतिम आहे. तेव्हां तुम्ही दोघे एक होऊं शकलांत…"

इतक्यांत मेघांच्या गडगडाटासारखा गंभीर ध्वनि कानी आल्यामुळें दमयंती भानांवर येते. ती चारी दिशांना न्याहाळून पहाते; आणि शेवटी केशिनीकडे वळून तिला विचारते. " केशिनी ! कसला ग आवाज ? " केशिनी. " काय कीं बाई ! ढग तर दिसत नाहीत आणि मेघ गर्जना तर ऐकूं येते आहे. "

## ( १५ )

सूर्य अस्ताचलाकडे पुष्कळच झुकलेला आहे अशा वेळीं कुंडिनपुराच्या वेशीपाशीं बाहुकाचा रथ उभा असून वार्ष्णेयानें घोडे धरलेले आहेत. मावळत्या सूर्याच्या किरणांनी रथ, अश्व आणि त्यामध्यें बसलेले ऋतुपर्ण आणि बाहुक यांना कांहीं एक औरच झांक आलेली आहे. बाहुकाचा काळा सांवळा चेहरा देखील कांतिमान् दिसतो आहे.

इतक्यांत नगराकडच्या बाजूनें वेशीच्या आंतून एक घोडेस्वार भरधांव घोड घेऊन येतो; व रथाजवळ आल्याबरोबर तांतडीनें उतरून ऋतुपर्णास प्रणाम करतो; व सस्मित वदनानें व नम्रपणानें बोलूं लागतो.

" आपलं स्वागत असो ! महाराज आपली उत्सुकतेनें वाट पहात आहेत; चलावं आपण ! "

बोलणं झाल्यावर घोडेस्वार पुनः प्रणाम करतो व विनम्र मस्तकानें रथाच्या बाजूला उभा राहतो. बाहुकाला उद्देशून ऋतुपर्ण म्हणतो. " बाहुका, चल ! "

वेशीत उभे असलेले पहारेकरी, रथ वेशीत शिरतांच ऋतुपर्णास प्रणाम करून त्याचा जयजयकार करतात. रथ वेगानें चालूं लागल्याबरोबर त्याचा पुनः मेघगर्जने प्रमाणें गडगडाट होऊं लागतो.

## ( १६ )

### पुनः उद्यानांत

**दमयंती**—" अगबाई ! पुन्हां झाला बघ आवाज ! "

**केशिनी**—" खरंच की ! अन् आतां तर थांबतही नाही. "

**दमयंती**—" शिवाय, अगदी जवळजवळ येतोसा वाटतोय्. "

दमयंतीचं बोलणं संपतं न संपतं तोंच इंद्रसेना आणि इंद्रसेन तिच्याकडे धेऊन भीतीनें तिला बिलगतात.

दमयंती इंद्रसेनेला उचलून घेते व इंद्रसेनाच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत त्याला धीर देते. इंद्रसेना दमयंतीच्या मुखाजवळ आपलं मुख नेऊन सभय स्वरानं विचारते—" आई, काय ग आहे हें ? "

दमयंती लगेच इंद्रसेनेला पोटाशी घेऊन तिचे पटापट् मुके घेते व म्हणते—" भ्यालं होय माझं बाळ ? " ( नंतर थट्टेच्या स्वरांत ) " अहारे भागूबाई ! "

इतक्यांत केशिनी म्हणते—" अगबाई, मोर दिखील ओरडायला लागले. "

दमयंती चकित होऊन इकडे तिकडे पहाते न पहाते तोंच केशिनी पुन्हां म्हणते—" अन् देवि, हा हत्तींचा देखील शब्द ऐकू येतो आहे ! "

इतका वेळ ऐकूं येणारा गडगडाट आतां अधिकच जोरानें ऐकूं येऊं लागतो; आणि आतां मात्र दमयंतीच्या चेहऱ्यावर निरनिराळ्या भावछटांची विलक्षण शिवाशिवी सुरू होते. प्रथम तिला विस्मय वाटतो. मग कांहींच नक्की न कळल्यामुळें ती गांधळून जाते; आणि मग एखादी गोष्ट अंधुकच आठवावी परंतु नक्की काय तें ध्यानात येऊं नये असा तिचा चेहरा होतो. ती केशिनीकडे वळून म्हणते—

**केशिनी**—हा आवाज तुला नाही का गं ओळखीचा वाटत ? कसला बरं आवाज असेल हा ? कुठं बरं ऐकला असेल मी हा ? "

केशिनी कांही कळत नाही असें खुणेनेंच दर्शवितें; इतक्यांत अश्वशालेकडून अश्वाचें खिंकाळणें ऐकूं येतें. तें ऐकून दमयंती थोडी दचकते व आपल्याशींच पण जरा मोठ्यानें म्हणते—" आमच्या निषधांतली घोडी आज का बरं खिंकाळताहेत ? "

आणि आतां मात्र एखादी हरवलेली वस्तु अनपेक्षितपणें सांपडावी असा चेहरा दमयंती करते; तिला जणूं हर्षवायूच होतो. त्या झटक्यांत इंद्रसेनेला खाली उतरवून व इंद्रसेनाला दूर लोटून दमयंती प्रासादाकडे घाईघाईनें जाऊं लागते. केशिनी तिच्या मागोमाग जाते, पण इंद्रसेना व इंद्रसेन इतर दासीं जवळच रहातात. केशिनी लौकरच दमयंतीला गांठते व त्या दोघी कांही झुडुपांआड अदृश्य होतात.

## ( १७ )

ऋतुपर्णाचा रथ कुंडिनपुरांतील एका राजमार्गावरून हळूं हळूं चालला आहे. ऋतुपर्ण, वार्ष्णेय आणि बाहुक आजुबाजूला नगराची शोभा पहात आहेत.

**ऋतुपर्ण**—"बाहुका, आणलंस खरं तूं मला विदर्भाला आजच्या आज."

बाहुक नुसत्या स्मितानेंच उत्तर देतो.

**ऋतुपर्ण** (वार्ष्णेयाकडे वळून)—"वार्ष्णेया, या नगरीत उत्साह तर मुळींच दिसत नाही. ना गुढ्या ना तोरणं. इथं एक स्वयंवर होणार आहे असं कुणाला स्वप्नांत तरी वाटेल काय ?"

**वार्ष्णेय**—"खरंच, महाराज, पण हें असं कां असावं ? अजून एकही राजा आपल्याला दिसला नाहीं. आणि नगरी तर एखाद्या विधवेसारखी शृंगार विरहित दिसते."

**ऋतुपर्ण**—"दुसरं स्वयंवर आहे म्हणून गुप्तपणें करायचं असेल. नाहीतर दुसरा कांहि डाव असेल. आपण तरी कशाला कळूं देतोंय् आपण स्वयंवराला आलों म्हणून..."

थोड्या अंतरावर दिसणाऱ्या राजवाड्याच्या रोखानें रथ जाऊं लागतो.

## ( १८ )

केशिनी आणि दमयंती घाईघाईनें जिना चढत असतात; आतां दहावीस पायऱ्या काय त्या चढायच्या राहिलेल्या असतात; दमयंतीनें केशिनीचा हात घट्ट धरलेला असतो; आणि ती केशिनीला जवळजवळ ओढूनच नेत असते. दोघींनाही बराच दम लागलेला असतो, तरीही दमयंती बोलतच असते; बोलतांना तिचा चेहरा बेफाम होतो—हर्ष, औत्सुक्य, भीति, शोक या सर्वांचेंच तिच्या मुखावर क्षण दोन क्षण कां होईना पण अति उत्कट असें प्रतिबिंब उठतें—जणूं या भावनांचं भीषण युद्धच सुरू असते—"केशी, केशी, माझं हृदय कसं भरून येत आहे.

इतका गोड, इतका मधुर, इतका प्रेमळ आवाज माझ्या नाथांच्या रथाशिवाय दुसऱ्या कशाचा होणार ? ( केशिनाला बेफामपणें एका पायरीवरच मिठी मारून ) " केशी, आतां मी काय करूं ग ? मला वेड लागणार आहे बघ ! केशी, खरंच, तुला नाहीं आनंद होत ? ( हें म्हणतां म्हणतांच दमयंती केशीचें चुंबन घेते ).

**केशिनी**—( स्वतःला सोडवीत ) " बाई ! बाई ! काय हें ? आपणही पडाल नि मलाही पाडाल ! "

**दमयंती**—( केशिनीचें खांदे धरून ) " पडूं दे, केशिनी, या आनंदांतच मला मरूं दे ! "

दमयंतीच्या डोळ्यांना आलेल्या पाण्याचा भलताच अर्थ करून केशिनी म्हणते—" कांहा तरीच काय हो बोलावं माणसांनी ? तुम्हांला किनई आतां खरंच वेड लागणार आहे ! "

त्या दोघी पुनः पायऱ्या चढूं लागतात. आतां दमयंतीला शोकाचा झटका येतो. " पण मी तरी काय करूं ग केशी. नाहीं आतां मला हा विरह सहन होत. आज जर त्यांची माझी भेट झाली नाहीं तर मी कांहीं यापुढें जगणार नाही. शपथेवर सांगते आगींत उडी टाकीन मी. "

**केशिनी**—" आज चालवलंय् तरी काय तुम्ही ? असं काय हें करतां अगदी ? "

**दमयंती** ( डोळ्यांना पाणी आणून )—" केशी, हृदय फुटतंय् अगदी. कसं सांगू ग तुला ? " हें बोलतां बोलतां पायऱ्या संपतात. गच्चीच्या दाराशीं आल्याबरोबर दमयंतीचे बोलणं एकदम खट्कन् बंद होतें; केशिनीचा हात सोडून देऊन ती झपाट्यानें गच्चीच्या समोरच्या कठड्याकडे जाते. त्यावेळो एकीकडे पायांना झपाट्यानें जावंसं वाटत असतं—एक मन म्हणत असतं ' चल, पळ, लौकर चल ', तर दुसरं भीतीनं म्हणत असतं ' पण हे नाथच असतील ना ? अन् नसले तर ? ' या वाक्यांचा भाव आणि त्यांची चाललेली झटापट इतक्या

स्पष्टपणें दमयंतीच्या चेहेऱ्यावर उठलेली असते कीं ही वाक्यं कुणीही सहज वाचूं शकला असता.

जसजसा गच्चीचा कठडा जवळ येत जातो, तसतसा औत्सुक्याचा भाव दमयंतीच्या मनावर ज्यास्त पगडा बसवितो; पण कठड्यावर अलगद् हात ठेवतांना भीतिचाच भाव ज्यास्त असतो असं वाटल्याखेरीज रहावत नाही.

दमयंती टक लावून, अधीर, घाबऱ्या, उत्सुक नयनांनी राजवाड्यासमोर येऊन उभा रहाणाऱ्या रथाकडे पहाते रथ उभा राहिल्याबरोबर वार्ष्णेय खाली उतरून रथाचे घोडे धरतो; वार्ष्णेयाच्या मागोमाग बाहुकही उतरतो; आणि ऋतु-पर्णही उतरतांना दिसतो......

दमयंती पुनः पुनः ऋतुपर्ण, बाहुक व वार्ष्णेय यांच्याकडे निरखून पहाते. ऋतुपर्ण व वार्ष्णेय यांना ती लगेच ओळखते पण बाहुक तिला एखाद्या तिऱ्हाइता-सारखाच भासतो. हळूं हळूं तिच्या चेहऱ्यावर निराशेची दाट छाया पसरूं लागते. आणि कठड्याला टेंकून असलेल्या दमयंतीची निराशेनें कंबरच खचते, व जवळच असलेल्या शिलासनावर ती मटकन् बसते. तिच्या डोळ्यांना पाणी येत नाही. कारण अश्रु गाळण्याची तिच्या मनाला शुद्धच नसते. ती इतकी हत्तबुद्ध झाली असते की काय करावं हें तिला न सुचल्यामुळें ती चारी बाजूला आपली बेहोष नजर फिरविते...मग हळू हळूं तिच्या डोळ्यात अश्रू उभे रहातात व ती अर्धवट केशिनीला व अर्धवट स्वतःला उद्देशून म्हणते.

" अशी कशी फसलें मी ! वार्ष्णेयानं तर इकडच्यासारखी विद्या मिळविली नसेल ! कारण रथाचा आवाज तर अगदी थेट तिकडच्यासारखाच होता. "

## ( १९ )

एक लांब रुंद, उत्तम तऱ्हेनं शृंगारलेलं, भीमाच्या राणीला शोभेसं दालन. एका उच्चासनांवर एका लोडाला टेंकून भीम बसलेला आहे. भीमाच्या पायाकडच्या बाजूला दमयंतीची आई बसलेली आहे. तिच्या हातांत एक पंखा असून ती मधून

मधून भीमाला वारा घालीत आहे. तिच्या चेहऱ्यावर चिंता तर दिसून येतेच पण मधूनच आपल्याला माहीत असलेली एखादी गोष्ट दुसऱ्याला कळूं नये अशी इच्छा असली, आणि ती त्याला कळली की काय, किंवा कळली तर कळे, अशा विचारांनी वाटणाऱ्या भीतीचीही छटा तिच्या चेहऱ्यावर येऊन जाते, आणि ती झट्‌कन् भीमाच्या चेहऱ्याकडे पाहून आपल्या मनाचं समाधान करून घेते.

**भीम**—" भांगासुरि ऋतुपर्ण आला आहे हें तुला कळलं काय ? "

**महादेवी**—" नाही बाई ! पण सांगत होती खरं, कुणीसं आलंय् म्हणून कां ?"

**भीम**—" विशेष कांहीं नाही ! पण आजच या ऋतुपर्णाला एवढा प्रेमाचा उमाळा कुठून आला ? "

**महादेवी**—' म्हंजे ? '

**भीम**—" अग, मी जेव्हां त्याला विचारलं की आज कशी पायधूळ झाडली, तर म्हणे आलोंय् आपला सहज भेटायला. एखादं पोर तरी फसेल काय अशा उत्तरानं ?......"

( ' खरंच कुणी तरी फसेल का ? काय तरी बाई माणसं ही ! ' अशा अर्थानें महादेवी आपली मान वेळून नुसते ' हुं ' करतात. )

" आतां तूंच सांग, हा भांगासुरि ऋतुपर्ण शंभरांवर योजनं ओलांडून इथं येतो तो काय केवळ मला भेटायला ? काय प्रेम वायां चाललंय् अगदी !...या ऋतुपर्णाला वाटलं असेल की आपल्या लाघवी बोलण्यानं आपण भीमाला सहज फसवूं. पण म्हणावं भीम इतका कांहीं दुधखुळा नाही...."

**महादेवी**—( सस्मित मुखानें ) " दुधखुळे बरे असाल ! उलट त्या ऋतुपर्णाच्याच मागें लावलं असेल आपण हेरांचं शुक्लकाष्ठ.

( भीम थोडेसें हंसून म्हणतो ) " अग, असं केल्याशिवाय भागतंय् कुठें ? या राजकारणांत जरा गैरसावध राह्यलं, थोडीही चूक झाली तर राज्यच नाही. डोकं दिसेल रडायचं. राजकारण म्हणजे नुसती तारेवरची कसरत आहे. "

**महादेवी**—" मग ? कांही कळलं का ? "

**भीम**—" एवढ्यांत कसं कळेल बरं ? ( महादेवी एक सुटकेचा श्वास सोडते. पण हें कांहीं भीमाच्या लक्षांत येत नाही. ) पण इतकं मात्र ऐकलं कीं नलाचा सारथि वार्ष्णेय ऋतुपर्णाबरोबर आला आहे. त्याच्याकडून माहिती सहज काढतां आली असती, पण तो कुठं बाहेर गेला आहे वाटतं ! आल्याबरोबर त्याला भेटायची व्यवस्था केली आहे मी. "

**महादेवी**—" धन्य ग बाई ! कसलं मेलं तें राजकारण. एक क्षण उसंत नाही जिवाला ! "

**भीम**—( उच्चासनावरून उठून महादेवीच्या खांद्यावर हात ठेवीत ) सखे, राजपद अन् सुखाची झोंप यांचा संयोग अजून कुणाच्या ऐकिवांत नाहीं. "

## ( २० )

## भीमाच्या राजवाड्यासमोरील पटांगणाची एक बाजू

या बाजूला पश्चिमाभिमुख अशी एक खोल्यांची रांगच रांग असून, त्या रांगेसमोर उत्तम असा एक रथ उभा आहे. त्या रथांत पश्चिमेकडेच तोंड करून रथाच्या एका खांबाला टेकून बाहुक दीनपणें पडलेला असतो. अजून सूर्यास्ताला अर्धा पाव घटका अवकाश असल्यामुळें सूर्याचे किरण रथावर आणि बाहुकाच्या सर्वांगावर पडलेले आहेत. बाहुकाच्या मागच्या खोल्यांच्या रांगांवरही ते पडलेले असल्यामुळें आसमंतातील सर्व भाग प्रकाशमान झाला आहे.

केशिनी बाहुकासमोर येऊन उभी राहते व स्त्रियांना साजेशा आणि सहज अशा प्रेमळ स्वरानें व सस्मित मुखानें म्हणते.

" बाहुक ! आपले धनी रसिक आहेत यांत शंका नाहीं. खरंच, किती हो चतुर आहांत तुम्ही ? दमयंती देवीच्या प्रश्नाचं कसं हो उत्तर सुचलं तुम्हांला ? इतकं सुंदर, इतकं मधुर काव्य करायला कुठं हो शिकलांत तुम्ही ? ( अधिकच

लडिवाळपणानें रथाच्या चाकावरच्या कठड्यावर कोंपर ठेऊन त्यांवर आपली हनु टेकीत आणि बाहुकाकडे टक लावून पहात ) शिकवाल मला ?......"

**बाहुक**—( केशिनीच्या कटाक्षांचा आणि अंगचेष्टांचा बाहुकावर कांहींच परिणाम होत नाहीं. तो तिला थोड्याशा कठोर आवाजांतच तिला उत्तर करतो. ) "काव्य हें शिकवून येत नसतं तें जगावं लागतं. काव्य म्हणजे उमलत्या हृत्पुष्पांचा सुगंध, किंवा मनो वीणेचं मनोहारि गीत !......"

**केशिनी**—( बाहुक काय बोलतो इकडे लक्षच नाही असें दाखवीत आणि तिसरेंच कांही तरी आठवल्यासारखें करीत )—"खरंच ! कांहो ! नलाचं रूप कशानं हो नष्ट झालं असेल ? तुम्ही म्हणतां देवीनाच नलाचं वास्तव्य ठाऊक, अन् त्या तर बिचाऱ्या शोध करून करून जेरीस आल्या. त्यांना तर जीव अगदी नकोसा झालांय्. इकडे तुम्हीं तर सांगता नल आपल्या खाणाखुणा कुणालाच सांगत नाही. मग कसं हो करावं आम्ही ? ......"

केशिनी जणु अगदी अप्रिय आणि कंटाळवाणं बोलते आहे असें भासवीत, जांभया देत देत बाहुक रथाखालीं उतरतो आणि जोरानें अंगाला आळोखे देत म्हणतो—" जाऊं द्या हो ! मला आतां लागलं पाहिजे स्वयंपाकाला ! " असें म्हणून केशिनीकडे पाठ करून नल चालूं लागतो; त्यावेळी त्याच्याकडे पाहून केशिनी गालांतल्या गालांत स्वतःशीच मिस्किलपणें हंसते, आणि अगदी आर्जवी स्वरांत म्हणते—" मी येऊं का मदत करायला ? माझा वेळ जाईल, अन् तुम्हां-लाही सोबत होईल. "

केशिनीचे भाषण ऐकलें न ऐकलेंसें करून कांही उत्तर न देतां बाहुक चालूं लागतो; तो थोड्या अंतरांवर दिसणाऱ्या एका दारांतून आंत जाईपर्यंत केशिनी रथालाच रेलून स्वतःशी हंसत उभी असते. बाहुक दिसेनासा झाल्याबरोबर तीही भराभर त्याच्या मागोमाग जाते.

## ( २१ )

केशिनी खोलीत दोनचार पावलें गेली असेल नसेल तोंच बाहुक, आंतून एका मुठींत गवताची एक जुडी घेऊन खालच्या मानेनें येतांना दिसतो. त्याचा

चेहरा केशिनीला पाहून ज्यास्तच प्रसन्न होतो जणूं कांहीं झालेंच नाहीं अशा चेहऱ्यानें केशिनी त्याचेकडे पहात असते. केशिनीकडे विशेष लक्ष न देतां बाहुक दारांतून बाहेर येतो व आता अगदीं मावळूं लागलेल्या सूर्यास वंदन करून ओठांनीं कांहीं मंत्र पुटपुटतो. तों त्याच्या हातांतलें गवत पेट घेते. बाहुक पुनः सूर्याला नमस्कार करून मागें वळतो व खोलींत जाऊन एक मोठा चुला पेटवतो. हा सर्व प्रकार पाहून केशिनी अगदीं चकित होते. परंतु कांहींच न बोलतां ती खोलीच्या मध्यापर्यंत जाऊन एका भिंतीला टेंकून उभी राहते. तिच्या समोरच्या भिंतीशी तिला पाण्याचे कांहीं रिकामे माठ दिसतात. त्यांच्याकडे ती पहात असते त्यावेळी बाहुक तिच्या आणि त्या रांजणांच्या मध्यें येऊन उभा राहतो व तिला उद्देशून तिरस्कार दर्शविणाऱ्या आवाजानें म्हणतो—

"काय तुमच्या इथली व्यवस्था ? इथं कुठें अग्नि मिळायचा नाहीं कीं कांहीं नाहीं. अन् हे समोरचे घट तरी भरले आहेत का ? आमच्या राजांनीं काय हवा खाऊन राहायचं ? अजून शिधा आलेला नाहीं तो नाहींच. हरकत नाहीं. आमच्यांत हिंमत असेल तर आम्ही सर्व हवं तसं घडवून आणूं. !"

असं म्हणून बाहुक घटांकडे वळून त्यांना नमस्कार करतो; आणि त्यानें मंत्र म्हणतांच घट पाण्यानें भरून येतात. केशिनी थक्क होऊन पहात असतांच तो तिला एकदम म्हणतो—

"पहात काय उभ्या राहिलांत नुसत्या ! दाखवा बरं मला शिधा मिळण्याचं ठिकाण !"

केशिनी लगेच स्मित करून म्हणते—"हो ! हो ! चला कीं, त्यांत काय आहे मोठंसं ?"

त्या खोलीला असलेल्या एका दारांतून केशिनी त्याला बाहेर एका बागेतून नेते. ती पुढें जात असतां बाहुक थांबून जवळच असलेल्या एका झाडाची फुलं तोडून ती हुंगतो. व ती चुरगळूं लागतो. याच वेळीं बाहुक आपल्यामागून येतो आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं केशिनी मागें वळून पहाते. आणि बाहुकानें चुरगळ-

लेलीं फुलंही लगेच पुनः टवटवीत होतांना जेव्हां तिला दिसतात तेव्हां मात्र ती आश्चर्यानें आपल्या तोंडावर हात ठेवते. आणि कांहीं बोलण्याचा आविर्भावही करते, परंतु लगेच स्वतःला सांवरून घेऊन चूप बसते व पुढें चालूं लागते.

## ( २२ )

सूर्य नुकताच अस्ताला गेला असला तरी संधिप्रकाश मात्र भरपूर आहे. गच्चीवर आणि राजवाड्यासमोरील प्रांगणांत तर वस्तू न् वस्तू स्पष्ट दिसते आहे. दमयंती गच्चीवरील शिलासनावर कठड्याला कुशि टेंकून व त्यावर आपला एक हात आडवा पसरून बसली असून ती मधूनच आपल्या सुंदर बोटांनीं कठड्यावर तबला वाजविल्याप्रमाणें आघात करीत आहे. आणि तिची शून्य नजर मधूनच भूमिकडे तर मधूनच दूरवर शून्यांतच स्थिरावते आहे. दमयंतीच्या समोरच कठड्याच्या भिंतीवर रेलून केशिनी उभी आहे आणि ती आश्चर्याच्या स्वरानें दमयंतीशी बोलते आहे. केशिनीचं बोलणं दमयंती इतक्या एक चित्तानं ऐकते आहे कीं तिला त्या हकीकतीविषयीं वाटणारा जिव्हाळा तिच्या चेहऱ्यावर पूर्णपणें प्रतिबिंबित झाला आहे.

**केशिनी**—( सोत्सुक, सादर, सकौतुक स्वरानें )—" देवि मला तरी बाई ते यक्षगंधर्वच वाटतात. सूर्याकडे गवत केलं, तें पेट घेतं; रित्या रांजणाकडे नुसतं पाह्यलं तरी ते लगेच पाण्यानं तुडुंब भरून येतात. ते कधीं मला वांकतांना दिसलेच नाहींत. दारंच जणूं उंच होऊन त्यांना वाट करून देतात. देवि काय सांग ते सुंदर नसलेत तरी ते कुठंही गेले तर इतरेजन त्यांना आपण होऊनच उत्थापन देतात; त्यांना वाट मिळायची तर कधीं मोठ्या गर्दीतही पंचाईत पडत नाही. आणि त्यांच्याइतकी स्वच्छता नि टापटीप तर आपल्या वाड्यांत देखिल मला कधीं दिसली नाहीं..."

**दमयंती**—( उत्सुकतेनें )—" अन्, ते फुलांचं काय म्हणालीस ? "

**केशिनी**—"अहो, असला चमत्कार तर मी कधीं ऐकलाही नव्हता तर मग पहाणार कुठून ? त्यांना मी मुदपाकखान्याकडे नेत होतें तेव्हांची गोष्ट. त्यांच्या

पावलांचा आवाज ऐकूं येईना म्हणून मी आपलं सहज मागें वळून पाह्यलं. तर ही सारी आपली फुलं चुरगळत उभी. त्यांना मला वाटतं फुलं फार आवडतात, कारण त्यांचं माझ्याकडे लक्षही नव्हतं......त्यांनीं आपली फुलं कुस्करतच जावी अन् फुलांनीं आपलं पुन: टवटवीत होतच जावं. माझा मुळीं माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. अन् म्हणून मी त्यांना विचारणार होतें हें असं कसं म्हणून; पण म्हटलं जाऊं द्या, उगाच संशयाला जागा नको......"

दमयंतीच्या चेहेऱ्यावर नुसता आनंदीआनंद पसरलेला असतो; ती सगद्गद स्वरानें म्हणते.

" केशि तेच बरं, तेच! आतां तर संशयाला जागाच नाहीं कुठं!......... अन् माझं नांव ऐकून त्यांनी बेचैन तरी कां होऊं नये! न होते तरच नवल!"...

**केशिनी**—" अहो, हो न! तुमचं नुसतं नांव काढलं की त्यांचे प्राण जणूं कंठीं येतात; त्यांचे डोळे पाण्यानी भरतात; गळा दाटून येतो, ऊर भरून येतं. आपल्या भावना लपवायचा ते किती प्रयत्न करतात; पण त्यांना यश कधीच येत नाहीं! "

**दमयंती**—( दुःखानें विव्हळत्या स्वरानें ) " नाथ, आपण अजून कां बरं प्रकट होत नाहीं. कां आपल्या जिवाला छळतां उगाच? अन् माझा तरी किती अंत पाहाल?......"

**केशिनी**—" देवि, असं करूं या, का?"

**दमयंती**—" कसं?"

**केशिनी**—" आतां त्यांचं काम झालंच असेल; ते हवा खायला रथावर येऊन बसतील. मी कुमार आणि कुंवर यांना घेऊन सहजच म्हणून त्यांच्याकडे जाते. म्हणजे त्यांचं खरंच बिंग उघडकीस येईल. किती झालं तरी पितृहृदय आहे तें; त्यांना आपलं मन आवरता येणार नाहीं......आपण इथंच बसून सारा प्रकार पाहून काय तें ठरवावं....."

**दमयंती**—( दमयंतीच्या डोळ्यांत अश्रूंची गर्दी होते व ती भरल्या आवाजानें म्हणते—तिनें केशिनीचे दोन्ही हात आपल्या हातीं घेतलेले असतात ) " केशि, असलं प्रेमळ हृदय तूं कुठून मिळवलंस? किती ग चतुर आहेस तूं? तू नसतीस तर माझं काय झालं असतं? तुझं ऋण मी कसं फेडीन?......"

केशिनीच्याही डोळ्यांत पाणी उभं रहातं, अन् ती खाली मान घालून म्हणते, कां बरं मला उगाच लाजवतां? आपणच ना माझ्यावर माया करून मला आपलंसं केलंत? मी तर एक यःकश्चित् दासी!......"

**दमयंती**—" नको बोलूस असं, केशी!"

**केशिनी**—" बरंऽ! मी जाऊं ना?"

**दमयंती**—" जा, होऊंच दे एकदा अखेरची परीक्षा "

केशिनी निघून जाते. दमयंती समोरच्या प्रांगणाकडे पाहूं लागते.

## ( २३ )

संधि प्रकाशांत रथाला टेकून, पश्चिमेकडे नजर लावून आपल्याच विचारांत दंग असलेला असा बाहुक निश्चलतेनें उभा असतो.

बाहुकाच्या मनःश्चक्षूंसमोर त्याच्या गतायुष्यांतील कांही प्रसंगांचीं स्मृतिचित्रें उभीं राहणं अगदीच साहजिक होतं.

दमयंतीच्या प्रथमदर्शनाचा तो एक अति मधुर प्रसंगः लोकपालांच्या आशीर्वादानें अदृश्य होऊन आपण दमयंतीच्या महालांत जातों. त्याचवेळेस, आपल्याच नांवावरून दमयंतीच्या सख्या तिची थट्टा करीत असतात, अन् ती ऐकून आपल्याला किती आनंद होतो. पण नंतर आपण कोणाच्या कामासाठी आलों आहों हें आठवून आपल्याला किती वाईट वाटतं. आणि शेवटीं कर्तव्य बुद्धीनें आपण स्वतःला प्रकट करतों. अन् मग केवढी गंमत होते. आपल्याच नादांत असलेल्या त्या साऱ्यांचे ते घाबरलेले चेहरे; तें, घाबरून, बोटांनीं अ

झांकणं; अन् नकळत 'अ य्या ऽ!' असा अस्फूट उद्गार काढणं. आणि मग, कोकिळाचं कूजित आकस्मिकपणें थांबतांच जसं ओकं ओकं वाटतं तसं आपल्याला वाटणं.

'खरंच, किती सुखाचे होते ते दिवस!'...आणि चारी लोकपालांना अव्हेरून, सस्मित वदनानें, आपल्यालाच दमयंती माला अर्पित होती तो प्रसंगः तो स्वर्गीय प्रसंगः

दमयंतीचं तें अप्सरांनाही लाजविणारं लावण्य, आणि तिच्या मुखावर दिसणारा तो प्रीतीचा अनुपम भाव. 'हाय! त्या प्रसंगाची आठवण झाली म्हणजे हृद्यांत केवढं भयंकर काहूर उठतं. अशा तऱ्हेनं याच कुंडिनपुरांत मला याव लागेल अशी मला स्वप्नांत तरी कल्पना होती का? दैवा इतकं लहरी दुसरं कांहीच नसेल!'......

अन् दमयंतीनें मला आपलं नेसतं वस्त्र फाडून दिलं तो एक विचित्र प्रसंगः किती यातना झाल्या माझ्या हृद्याला त्यावेळीं. माझ्यासाठी ती आपलं हृदयच विंधून देते आहेसं वाटलं मला तेव्हा!...पण तें वस्त्र मला देतांना तिच्या मुखावरचा भाव किती दिव्य होता! तें पाहून कुणाला वाटलं असतं का माझ्यासाठी ही सर्वस्वाचं ही दान इतक्याच आनंदानं करील,......पण स्त्रियांचीं मनं कधी कुणाला उमगली आहेत का? ......

इकडे राजवाड्याच्या पायऱ्या उतरून इंद्रसेन आणि इंद्रसेना याना बरोबर घेऊन केशिनी बाहुकाच्या रथाकडे जात असते. मध्येंच ती मान वळवून आणि उंच करून गच्चीवर बसलेल्या दमयंतीकडे पहाते; तिला दमयंतीचा नुसता चेहराच दिसतो. बाहुक ज्या दिशेकडे पहात असतो तिकडेच दमयंतीही पहात असते. जणूं तिकडे पाहिल्यानें बाहुकाच्या विचार विकारांचंच तिला ज्ञान होणार होतं. दमयंतीचाही चेहरा विचारमग्न, चिंताक्रांत असा दिसतो.

थोडं चालून गेल्यावर केशिनी, इंद्रसेन आणि इंद्रसेना यांना म्हणते— "पाहूं बरं, कोण रथाजवळ आधीं जातंय् तें? हं! थांबा, नीट उभे रहा...एऽऽक

( ती मुलेंही तिचंच अनुकरण करतात—ए ऽ ऽ क ) दो ऽ ऽ न ( दो ऽ ऽ न ) ती ऽ न ( तीन् )—

ती दोघंही मोठ्यानें हंसत किंचाळत रथाकडे धावूं लागतात, आणि बाहुक उभा असतो तिथेंच " मी ! आधी, मी ! ' असें ओरडत रथाला शिवतात. बाहुक आपल्या विचार तंद्रींतून, ते गोड आवाज ऐकून एकदम जागा होतो, आणि त्या मुलांकडे पाहूं लागतो. आणि एकदम त्याच्या मनाचा तोल सुटून जातो. तो इंद्र-सेनेला झट्दिशी उचलून घेऊन तिचे पटापट मुके घेतो, व लगेच दुसऱ्या हातानें इंद्रसेनास उचलून त्याचेंही मुके घेऊं लागतो. ती भाबडी पोरं त्याची ही कृति पाहून बावरून जातात; आणि त्याच्या डोळ्यांतून वहाणाऱ्या अश्रुधारा पाहून त्यांच्याही नेत्रांतून पाणी वाहूं लागतें, आणि ती दोघेंही मोठ्यानें गळा काढून रडूं लागतात. तें पाहून बाहुकाचा आपल्या मनावर असला, नसला ताबा ताबा एकदम नाहीसा होऊन तो मोठ्यानें हुंदके देतो; आणि अगदीं रडक्या स्वरांत मुलांना विचारतो—

" मला नाही ओळखलं ? हाय रे दैवा ! माझी मुलं देखील मला ओळखीत नाहीत ! किती फुटकं माझं नशीब. या हालांपेक्षां मरण पुरवलं !… "

इतक्यांत बाहुकाजवळ येऊन केशिनी म्हणते, ( तिच्यानंही तो देखावा पाहवत नाही; ती अश्रु पुसत पुसतच विचारते )—" काय म्हटलंत ? ही तुमची मुलं ? "

एखादा जबरदस्त धक्का बसल्याप्रमाणें दचकून बाहुक तिच्याकडे पहातो, व घाईघाईनें मुलांना खाली ठेवतो; आणि स्वतःला कसें बसें सांवरीत ओशाळल्या आवाजानें म्हणतो—

" नाही ! तसा नाहीं माझ्या म्हणण्याचा अर्थ ( हंसण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत )—माझीही मुलं थेट अशीच असल्यामळं मला राहवलं नाहीं ! "

**केशिनी**—( आश्चर्याचा आव आणीत )—" दमयंती देवींच्या मुलांसारखी आहेत तुमची मुलं ? कुठाहेत तीं ? "

**बाहुक**—"आहेत तिच्या माहेरी." (बाहुकाला आपली मान खालीं घालण्याशिवाय गत्यंतरच नसतें.)

**केशिनी**—(खोंचकपणें)—"म्हणजे! तुमचा अन् तुमच्या पत्नीचा वियोग झाला आहे?"

बाहुक नुसती मान हालवूनच होकर देतो; आणि नंतर लगेच थोडंसं भीतिचं नाटक करीत म्हणतो—

"हें पहा माझ्यावर थोडी दया करा. तुम्ही येवढ्या घटके दीडघटकेंत माझ्या-कडे निदान पांचसहादां तरी आलांत. मी आहे परका मनुष्य; मला इथं कुणीच ओळखीत नाही; मला आपलं सांभाळूनच वागणं बरं! तुम्ही कशाला येता वरचेवर? लोकांना उगाच भलता संशय यायचा, अन् फट् म्हणतां ब्रम्हहत्या व्हायची!"

केशिनीला तरी कुठें तिथं ज्यास्त वेळ थांबायचं असतं; पण तीही रागाचा आव आणून म्हणते.

"बरं! बरं! मला नका अक्कल शिकवूं! म्हणे लोकांना काय वाटेल? अगदी मदनच अहांत कीं नाही, लोकांना कांहि वाटायला! काय तरी बाई! ज्याचं करावं बरं, तो म्हणतो माझंच खरं! (मुलांना आपल्याबरोबर ओढीत) चलारे बाबांनो! ते आपले कोण आहेत म्हणून आपण इथं थांबायचं!—"

मुलांना घेऊन केशिनी पाठ वळविते, तेव्हां मात्र बाहुकाचा चेहरा अगदी पहाण्यासारखा होतो; आणि गच्चीवर बसलेली दमयंती तो पाहतेही, अन् काढायचा निष्कर्ष काढतेही पण.

## (२४)

दमयंती दूतांना भेटण्याच्या दालनांत उच्चासनावर एक पाय खाली सोडून अन् एक उराशीं घेऊन त्यावर हनु टेंकून बसली आहे. तिच्यासमोर त्याच उच्चा-सनाला टेंकून केशिनी उभी आहे. दमयंतीचें केस अगदीं मोकळे सुटायला झाले

आहेत, अन् त्यामुळें तिच्या चेहऱ्याभोंवती केसांचं जें एक वलय उत्पन्न झालं आहे त्यामुळें तिचा चेहरा अधिकच दीनवाणा दिसतो आहे. रडूनरडून तिचें डोळे सुजल्यासारखे झाले आहेत. तिचा आवाज क्षीण येतो आहे.

**दमयंती**—" केशी, आईनं हो म्हटलं काग मग ? "

**केशिनी**—" म्हटलं, पण त्यांना सगळं पटवून द्यावं लागलं. " दमयंती नुसता हुंकार देते.

**केशिनी**—" अन् मी बाहुकांना बोलावणंही करून आलेंय् तुमच्या नावानं."

**दमयंती**—( दीनपणें ) " येतील काग पण ते ? "

**केशिनी**—" येतील हो ! त्यांना तरी किती धीर धरवेल ? "

केशिनीचें हें वाक्य संपते न संपते तोंच बाहुक दारांत येऊन उभा राहतो; व थोडें थबकून पुढें येऊं लागतो. त्याची चालण्याची ढब एखाद्या राजासारखी असते. केशिनी थोडें वांकून हळूंच दमयंतीला म्हणते.—" आले " आणि मानेनें दाराकडे खुणावते.

दमयंती एकदम गडबडीनें उभी राहूं लागते. त्या गडबडीत आधीच सुटा-यला झालेले तिचें केंस पार मोकळे सुटून पाठीवर पडतात. कांही तिच्या कपोला-जवळ येतात, कांही खांद्यावर पडतात. उठतांना तिला आपल्या हातानें उच्चासनाचा आधार घ्यावा लागतो कारण बाहुकाकडे नजर फिरविल्याबरोबर तिला दुःखाचा उमाळा येऊन तिचें डोळें अश्रूंनी अगदी भरून जातात. अश्रूतून अस्पष्ट दिस-णाऱ्या बाहुकाच्या आकृतीकडे पहातां पहातां तिचा थोडासा तोल जातो. केशिनी चट्कन् पुढें सरून दमयंतीला आपल्या हाताचा आधार देते. तो घेऊन, पदर सांवरून, खाली मान घालून दमयंती एक क्षणभर उभी राहते, व नंतर आपला डावा हात केशिनीच्या खांद्यावर ठेऊन ती बाहुकाकडे टक लावून दीनतेनें पहाते. पहातां पहातां तिच्या डोळ्यांतून अश्रूंची झरणी लागते. क्षण अर्धा क्षण थांबून कांपऱ्या दीन आवाजानें ती बोलूं लागते.—

—( इकडे खोलीत शिरल्यापासूनच बाहुकाचें हृदय धडधडूं लागतें; आणि दमयंतीची ती केविलवाणी स्थिति पाहून तर त्याचें हृदय दुःखानें भरून येतें

त्याच्याही गालांवरून दुःखाश्रु ओघळत असतात, आणि शोकामुळें येणारे हुंदके तो कसे बसे आंवरीत असतो. )—

**दमयंती**—" आपल्या निजलेल्या पत्नीला, तिच्या नकळत, एका भयंकर अरण्यांत, एकटीच टाकून पळून गेलेला एखादा धर्मज्ञ वीर तुमच्या पहाण्यांत आहे का ? पुण्यवान् नलाशिवाय असलं शतकृत्य कोण करणार ? मी असा कोणता अपराध केला होता की नलदेवानं मला निराधार करून निघून जावं ? नला, तुमची आज्ञा मी स्वप्नांत तरी मोडली का ? तुमचं अप्रिय करण्याचं माझ्या मनाला दिखिल कधीं सहन झालं नाही बरं ! प्राणांपलीकडे मी आपल्यावर प्रेम केलं. इंद्रसेन आणि इंद्रसेना यांना आपण विसरलांत का ? ती दोघं म्हणजे आपल्या प्रेमाचं प्रतीक ! त्यांच्याकडे पहा, त्यांची आठवण करा ! अजूनही आपलं हृदय प्रेमार्द्र होत नाहीं का ? काय, आपलं हृदय प्रीतिशून्य झालं ? किती हो आपण कठोर आहांत ? अग्निब्राम्हणांसमक्ष दिलेली वचनं आपण विसरलांत का ? ' जीवांत जीव असं तों मी तुला दूर करणार नाही ' हें मला दिलेलं वचन आपण कस बरं विसरूं शकलांत ? सांगा, सांगा, तुमच्या त्या आणा शपथा कुठं गेल्या ?......"

असें बोलतां बोलतां दमयंतीची कंबर पार खचून जाते, आणि ती मागेंच असलेल्या उच्चासनावर मटकन् बसते. तिनें आपल्या हातांनीं आपला चेहरा झांकून घेतलेला असतो, आणि ती हुंदके देत असते. केशिनी तिच्या खांद्यावर हात ठेऊन बाहुकाकडे साश्रु नयनांनी पहात उभी असते.

**बाहुक**—( गद्गद स्वरानें )—" हे भीरु, आपल्यावर आजपर्यंत जीं संकटें आली त्याचं मुख्य कारण ' कलि ' होता, त्यानंच माझ्या शरीरांत शिरून मला द्यूतास प्रवृत्त केलं. आणि त्याच्यामुळंच आपल्यावर ही संकटपरंपरा ओढवली. पुढें तुझ्या शापानं, माझ्या पतोव्रतानं आणि ऋतुपर्णाच्या अक्षहृदय विद्येच्या प्रभावानं, कलीला माझ्या हृदयांत राहणं कठीण झालं. आणि मला वाटतं आतां आपला काल बदलला आहे···( एकदम एखादी गोष्ट आठवल्यामुळें शुद्धीवर आल्यासारखें करून कठोर स्वरांत )—दमयंति, तूं आज मला मनसोक्त नावं ठेऊन घेतलीस. मला दुष्ट म्हटलंस, नीच ठरवलंस; मला हृदय नाहीं, मला आपल्या शब्दांची चाड

नाहीं ! ठीक! ठीक ! मला नसली तर नसूं दे, पण तुझं काय? तुझ्या आठवणीनं, तुझं कसं होईल या भीतिनं माझं किती रक्त आटलं असेल ! रात्रीं मागून रात्रीं मी जागून काढल्या असतील ! अगदीं नको झालेलं जिणं केवळ तुझ्यासाठीं जगलो असेन ! ...पण तुला काय त्याचं! उलट बापाघरीं सुखानं राहून तूं मला विसरलीस ! गांवोगांव तुझ्या नांवानं दंवड्या पिटताहेत; देशोदेशी तुझ्या प्रेमाचं स्वरूप स्पष्ट होत आहे. नलावर प्राणांपलीकडेही प्रेम करणारी दमयंती दुसरं स्वयंवर करणार आहे! नलासाठी लोकपालांचाही त्याग करणारी दमयंती दुसऱ्या स्वयंवराला उभी आहे. असलं अलौकिक प्रेम, असली असामान्य सुंदरी ज्याला हवी असेल त्यानं धांवत वैदर्भीला यावं. हाती माला घेऊन प्रणयिनी दमयंती सज्ज आहे. या, या, पुण्याचा सांठा असेल इच्छा असेल तर दमयंतीला घेऊन जा. अखंड सौभाग्यवति... ..."

**दमयंती**—" नका, नका असं बोलूं ! "

**बाहुक**—" कां ? कां, नको ? माझ्या हृदयाच्या चिंधड्या करतांना बरं वाटलं. निर्लज्ज बाजारबसवी सारखं वागतानां लाज वाटली नाही.... ..."

**दमयंती**—( रागानें ) " बस्स ! ज्यास्त बोलूं नका ! असले शब्द मी ऐकून घेणार नाही. तुमचं माझ्यावरचं प्रेमच नष्ट झालं असेल तर मला पुन्हां तोंड दाखवूं नका. तुमच्या प्रेमासाठी मी वनवास पत्करला, तुमच्यासाठी अनोळखी गांवातल्या वात्रट पोरांनी वेडी समजून मारलेल्या दगडांचा मार मी निमूटपणें सहन केला; केवळ तुमच्यासाठी दासी पण पत्करलं ! वर्षानुवर्ष तुमच्या नांवाची जपमाळ ओढली ! इतके दिवस भयंकर मनस्ताप सोसला. रडून रडून डोळ्यांच्या खांचा झाल्या ! कशाला ? कशासाठी ? तुमच्यासाठीं ! तुमच्या प्रीतिसाठी ! अन् आज हे शब्द ऐकणं माझ्या कपाळीं आलं ! कशाला मी इतके दिवस जिवंत राहिले ? ... हृदया ! अजून तुझे तुकडे तुकडे कां होत नाहीत ? देवा आतां नको अंत पाहूं ! "

दमयंतीला दुःख इतकं अनावर होतं कीं ती तोंड झांकून हमसाहमशीं रडूं लागते. बाहुकाकडे पाहून केशिनी बोलूं लागते.

" महाराज, अशा कटु बोलण्यानं आपण देवीवर भयंकर अन्याय करीत आहात. आपण गेल्यापासून देवीच्या अश्रूंना खळ नाहीं; त्यांच्या डोळ्याला डोळा

नाहीं, कधीं सुखानं त्यांनी दोन घांस खाल्ले नाहीत. आपल्या येण्याची आशा होती म्हणूनच त्यांनीं तग धरली, नाहीं तर त्यांनी कधीच इहलोकची रजा घेतली असती......आणि आपल्याला इथं आणण्यासाठीच हा भयंकर धाडशी उपाय त्यांनीं योजिला..."

"निषधाधिपा, केशिनी म्हणते तें सारं खरं आहे—" महादेवी उद्गारतात. केशिनीचं भाषण संपायला आणि महादेवि आंत यायला एकच गांठ पडते. त्यामुळें केशिनीच्या म्हणण्याला त्या दुजोरा देतात. नल त्यांच्याकडे वळून पहातो. महादेवी दमयंती जवळ येऊन तिच्या पाठीवर हात फिरवीत म्हणतात.

"अखेर मी भीमीला म्हटलं होतं तसंच झालं. आपल्या कुशंकाच तेवढ्या खऱ्या ठराव्यात हा एक विचित्र योगायोग आहे. असो. (नलाला उद्देशून) नरवीरा! मी सांगते तेवढं शांत चित्तानें ऐकून घे, आणि मग काय तें ठरीव. अयोध्येला ज्या ब्राम्हणाच्या प्रश्नांना तूं उत्तर दिलंस तो ब्राह्मण आम्हींच पाठविलेला होता. त्याच्या तोंडून तुझं उत्तर ऐकल्याबरोबर दमयंतीला धीर निघेना. कांहीही करून तुला इथं आणावं असं तिच्या मनानं घेतलं. आणि तिनें मला हा अघोरी उपाय सांगितला. मी पुष्कळ नाहीं म्हटलं पण ती ऐकेना. तुला आलेली शंका मी बोलून दाखविली; पण ती हट्ट सोडीना. तिचं म्हणणं असं पडलं की माझ्या प्रेमानंच मी या संशयाचं निराकरण करीन......"

दमयंती एकदम म्हणते—"आई, मी उगाच बोललें नाहीं, मी कोणतंही दिव्य करायला तयार आहे. (हात जोडून गद्गद् स्वरानं) मी मनानंही नाथांशीं प्रतारणा केली असेल तर, जगद्भ्रमणा वायु, तूं माझा नाश कर! अखंड गति सूर्यदेवा, तूं तर जगताचा प्राणच आहेस, तेव्हां चुकूनही जर माझ्या हातून असलं पाप घडलं असेल तर तूं माझ्या पापी प्राणांचा नाश कर! हें अंतःकरणवासी चंद्रा, तुला माझं अंतःकरण स्पष्ट दिसतं आहे. प्रतारणेच्या भयंकर अपराधाचा थोडासाही कलंक तुला तिथं दिसला तर तूं मला गतप्राण कर! देवांनों, मी जे शपथेवर म्हणते तें जर खरं नसेल तर माझा नाश होवो! तें खरं असेल तर नाथांना तसं पटवून द्या!!"

इतक्यांत त्या दालनांत प्रकाशाचा एक धुक्यासारखा झोत पडतो, व आकाशवाणी होते. "हे नरवीरा नला! तूं निःशंक हो. दमयंतीचं आचरण हा वायु आज तीन वर्षे पहात आहे. हिच्या इतकी निष्पाप स्त्री अजून तरी माझ्या पाहाण्यांत नाहीं. तुझ्याप्रमाणें एका दिवसांत शंभर योजनें या जगांत दुसरा कोणीही येऊं शकणार नाहीं, ही खात्री असल्यामुळेंच या अपाप दमयंतीनें हा उपाय योजिला. तूं निःशंक मनानें हिला आपल्या हृदयीं स्थान दे."

नलासकट सर्व जण त्या फिकट होत जाणाऱ्या प्रकाशाला वंदन करितात; व प्रकाश नाहीसा होतो. दमयंतीकडे वळून, डोळ्यांत पाणी आणून ओशाळल्या स्वरानें नल बोलूं लागतो—

"प्रिये, मला क्षमा कर असं मी कोणत्या तोंडानं म्हणूं!"

**दमयंती**—"माझी क्षमा मागण्यासारखं आपण काय बरं केलं आहे!"

**नल**—"आपल्या उदार हृदयानं मला तूं लाजवितेस देवी."

**दमयंती**—"माझं आणि आपलं हृदय निराळं का आहे? मी म्हणजे आपली केवळ छाया."

**केशिनी**—"पण महाराज, आपलं रूप असं कशानं बरं झालं?

**नल**—"कर्कोटक नागाच्या दंशानं; तो एक मोठा इतिहासच आहे. (दमयंतीकडे वळून) सखे, क्षणभर थांब हं! मी दुसरी वस्त्रें नेसून येतो म्हणजे मला पूर्वीचें रूप प्राप्त होईल!"

नल जाऊन येई तों तिघीही अगदीं अधीर होऊन एक शब्दही न बोलतां त्याची वाट पहात बसतात; नलही एक दोन क्षणांत परत येतो. त्याला मूळच्या स्वरूपांत पहातांच दमयंतीला अत्यानंद होतो, व ती 'नाथ, नाथ' करीतच धांवत जाऊन त्याच्या गळ्यांत पडते.

नलही तिला प्रेमानें आलिंगन देऊन तिचीं अनेक चुंबनें घेतो.

इकडे महादेवि आणि केशिनी यांचे डोळे आनंदाश्रूंनी डबडबतात.



# आगामी प्रकाशनें



- **कल्पनांचें साम्राज्य** .... कादंबरी
  —पु. य. देशपांडे
- **तिसरें राज्य** .... .... नाटक
  —शरच्चंद्र टोंगो
- **दूर कुठें तरी** .... .... कादंबरी
  —लीला देशमुख
- **चार जून** .... .... कादंबरी
  —शं. बा. शास्त्री,
- **आराधना** .... .... कथासंग्रह
  —लीला देशमुख

---

नागपूर प्रकाशन, सिताबर्डी, नागपूर.